0·55

# भारतीय साम्राज्य.

## नारायण भवानराव पावगी.

यानें रचिलें असे.

तें

पुणें येथें "सत्यप्रकाश" छापखान्यांत छापिलें.

शके १८१९

विजयनाम संवत्सरे.

—:0:—



किंमत १४ आणे.

श्री

सद्‌गुरु चरणारविंदीं

नमन करून

ही

ग्रंथरूपी

यथाशक्ति व यथामति केलेली

अत्यल्प

# देशसेवा.

नारायण भवानराव पावगी

यानें

आपल्या दयितआर्यभूमीच्या ठिकाणीं

असलेल्या अत्युत्कट

प्रीत्यर्थ

सकल

आर्यभगिनींस व आर्यबांधवांस

प्रीतिपूर्वक

अत्यादरानें समर्पिली असे.

# भारतीय साम्राज्य.

## पुस्तक पांचवें.

### प्रस्तावना.

स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ॥

१ भारतीय साम्राज्याच्या प्रथम पुस्तकांत आर्य-देश व तत्संबंधीं वृत्तांत याविषयींची हकीकत दिली असून त्यांत एकंदर नऊ भाग आहेतः—

१ देशस्थिति व वर्णन २ उद्भिज्जसंपत्ति, व मुख्य उत्पन्न होणारे पदार्थ. ३ उद्भिज्जसंपत्ति व शाक पुष्पफलवैचित्र्य. ४ कृषिकर्म व तत्संबंधीं खतें, राब, व साधनें. ५ कृषिकर्म व तत्संबंधीं जनावरें, आणि जमिनीचा मगदूर. ६ प्राणिजातिसंपत्ति. ७ खनिज संपत्ति. ८ वातावरणमीमांसा. आणि ९ भरतखंड-भूरचना.

२ द्वितीय पुस्तकांत आर्य लोक व त्यांचे बुद्धि-वैभव याचेंच दिग्दर्शन केलें आहे, व त्याचे पांच भाग आहेतः—

१० आर्यांचें मूलनिवासस्थान, व त्यांचें वैभव. ११ आर्यांची सामाजिकरचना, व धर्मसंस्था. १२ आर्यभाषा, व तिचें श्रेष्ठत्व. १३ वेद, व वेदांगें. आणि १४ महाकाव्यें, व गद्यपद्यादि भाषाशास्त्र.

३ तृतीय पुस्तकांत आर्येतिहास व भूगोल, याविषयींचा वृत्तांत दिला आहे, व त्याचे पांच भाग केले आहेतः—

१५ इतिहास व भूगोलासारख्या ग्रंथासंबंधीं आर्यांचें न्यूनत्व, व त्यांचीं कारणें. १६ वेदकालीन इतिहास. १७ उत्तर हिंदुस्थांतील प्राचीन नृपावलि. १८ दक्षिण हिंदुस्थानांतील प्राचीन नृपावलि. आणि १९ प्राचीन आर्यभूगोल.

४ चवथ्या पुस्तकांत, आर्यशास्त्र व कला यांविषयींचें सविस्तर विवेचन आहे, व त्याचे बारा भाग केले आहेतः—

२० धर्मशास्त्र. २१ वेदान्तशास्त्र. २२ ज्योतिःशास्त्र, भूमितिशास्त्र, अंकगणित, व बीजगणित. २३ वैद्यशास्त्र. २४ नीतिशास्त्र. २५ धनुर्वेद. २६ गांधर्ववेद अथवा गायनकला. २७ चित्रकला. २८ शिल्पकला व निर्माणविद्या. २९ पटचातुर्य व रागकौशल्य. ३० वास्तुविद्या, यंत्रकला, गंधद्रव्यक्रिया, पाकशास्त्र, द्यूतचातुर्य, व इतर कला. आणि ३१ लेखनकला.

५ प्रस्तुतच्या पांचव्या पुस्तकांत, **आर्यशासनपद्धति** व **संस्था**, यांविषयींचें इत्थंभूत वर्णन दिलें आहे, व त्याचे एकंदर तीन भाग केले आहेतः—

**३२ आर्यांची राज्यव्यवस्था. ३३ आर्यांची शासनपद्धति.** आणि **३४ आर्यांचें स्थानिकस्वराज्य.**

मुक्काम पुणें, मंगळवार. मार्गशीर्ष शुद्ध ११ शके १८१५ विजयनाम संवत्सरे.

**नारायण भवानराव पावगी.**

# अनुक्रमणिका.

## पूर्वार्ध.

# पुस्तक पांचवें.

## भाग ३२ वा.

—:o✱o:—

### आर्यांची राज्यव्यवस्था.

आर्यांची फार प्राचीन काळापासून आजपर्यंत चालत आलेली राज्यपद्धति—तिची पीठिका—राजसत्ता—राजतेज—प्रजाप्रभुत्व—प्रजा प्रभुत्वाचें पृथक्करण—अधिकार समुच्चय व—लोकमत—लोकमताच्या अनादरामुळें, पदच्युत होण्याची भीति—शास्त्याची अवश्यकता—आर्यांचें तत्संबंधीं दूरदर्शित्व—मनुस्मृति—राजाची—इतिकर्तव्यता—मन्वाज्ञा—राजमंत्री—राजदूत—प्रजासंरक्षण—बाह्य परचक्राचा बंदोबस्त—अंतःसंक्षोभ न होण्याविषयीं तजवीज—शांततेचे उपाय—साम, दाम, दंड, व भेद—उचितकाळीं शत्रूवर चाल—युद्धासाठीं, लढवय्ये लोकांची सैन्यांत भरती—सैन्याचे विभाग व त्यांचें आधिपत्य—व्यूहरचना—वध्यावध्य विचारांत हिंदूंची अनुकंपा—जिंकलेल्या देशाची व्यवस्था—युद्धजित द्रव्य—खर्चासाठीं करभाराची व्यवस्था—धंदेवारी-प्रमाणें कराचा यथान्याय विभाग—जकात, व दस्तुरी—लष्करी

[redacted]

व मुलकी बंदोबस्त—तत्संबंधीं कामगारांचा मुशाहिरा—चाऱ्ही पुरुषार्थ—राजनीति, व—देशांतील शांतता.

---

# भाग ३३ वा.

## आर्यांची शासनपद्धति.

राजा, व तन्नियुक्त प्रतिनिधि, त्यांचें न्याय करण्याचें काम—प्राचीन काळच्या व सांप्रतच्या स्थितींत बदल—पंचाचें सहाय्य—न्यायाधीशाच्या मनाची समता—मनुस्मृतींतील नानाविध विषय—फौजदारी अपराधांचें वर्गीकरण—त्यांतील गुणदोष—फौजदारी कायद्यांतील शिक्षेचे प्रकार—दंडाची मर्यादा—तुलादि परीक्षण—साधारण अपवाद—असत्य भाषण करण्याविषयीं धर्मशास्त्राचा निषेध—सत्याविषयीं हिंदूंची नैसर्गिक प्रीति—सत्याच्या अबाधित नियमांत, अपवादानें मर्यादा ठरविण्याचें कारण—अपरिहार्य उणीव—तत्संबंधीं बेनूथँमूचें मत—अनृत भाषणास अतिदारुण शिक्षा—दिवाणी बाबींचें नियमन—दिवाणी व फौजदारी बाबींचें मिश्रण—कर्जवसुलाची रीती—व त्यापासून उद्भवणारे दुष्ट परिणाम—सरकारांत दाद मागितल्यावर, काम चालण्याची पद्धति—व्याजासंबंधीं नियम—तीन प्रकारचीं प्रमाणें—अप्रत्यक्ष प्रमाण—क्रिया, व शपथ, आणि तत्संबंधीं प्राचीनकाळची समज—भोळ्यासमजूतीचीं कारणें—प्रत्यक्ष प्रमाण—साक्षीदारांसंबंधीं वर्ज्यावर्ज्य विचार—पुराव्यांतील ग्राह्य गोष्टी—उपलब्ध असलेला साक्षीदार घेण्याची अवश्यकता—ग्राह्य व अग्राह्य गोष्टींचें विवेचन—पुराव्याचें बलाबल—लेख्यप्रमाण—जबरीनें करून घेतलेल्या दस्तऐवजाचा परिणाम—करार—जामिनकी—क्रयविक्रय—वेतन—निक्षेप—

तारणगहाण—ठेव—मुदतीचा कायदा व त्याचें मूलतत्त्व—मुदतीची मर्यादा—अपवाद, आणि त्यापासून झालेला फायदा.

---

# भाग ३४ वा.

## आर्यांचें स्थानिकस्वराज्य.

भरतभूमींतील स्थानिक स्वराज्य, व त्याचें बीज—त्याचें पुराणत्व— जीवनकलह, व त्याचीं मूलतत्त्वें—उदरपोषण, स्वसंरक्षण, व स्वावलंबन—स्वपोषणाविषयींची तजवीज—स्वसंरक्षणार्थ बंदोबस्त—स्वसंरक्षणाच्या संबंधानें, वेदकालीन स्थिति—अनार्य लोकांचा बंडावा—अनार्यांची वशता—काबीज केलेल्या प्रांतांतील शांतता व बंदोबस्त—ग्रामाधिपतींची योजना—नगराधिपति व त्यांचें काम—देशाची संरक्षा—स्वावलंबन—ग्रामभृत, किंवा गांवनोकर—ग्रामरचना, व तिचें प्राचीन आणि अर्वाचीन स्वरूप—पाटील व त्यांचें कर्तव्य—त्यांचें वजन—गांव पंचायत—चावडी, किंवा पंचायत भरण्याची जागा—ग्रामसभेचें राजकीय किंवा सामाजिक दृष्टीनें महत्व व तिचें प्रातिनिधिकत्व—लोकमताचें, ग्रामसभेंत, आणि भारतवर्षांत, प्राबल्य—ग्रामसंस्थेची संघशक्ति, व पाटलाची इतिकर्तव्यता—चिल्हरखर्च, व आल्यागेल्याची बरदास्त—इतर सार्वजनिक खर्च, व त्याचा समाईक बोजा—किरकोळ बाबतींत पाटलाचा हुकूम, व तो अमलांत आणण्याविषयीं रयतेची तत्परता—पाटील व ग्रामाधिपतीचें वेतन—तत्संबंधीं इनाम जमीन व रोकड नेमणूक—पाटील हा प्रजेचा प्रतिनिधि, व सरकारचा नोकर—ग्रामलेखकाचें काम—इतर जमीनदारांचीं कामें, व त्यांचें हक्क—देशाधिकारी व देसमुख—ग्रामयाजक—ग्रामज्योतिषी—ग्रामकर्मार—ग्रामतक्ष

—ग्रामकुलाल—ग्रामरजक—ग्रामनापित—ग्रामपाल—ग्रामवैतालिक—ग्रामगोदुह—ग्रामघातिन्—ग्रामप्रेष्य, व त्यांचें विविधकर्म ग्रामघोषिन्—ग्रामचर्मकार—पोतदार आणि इतर कामगार—गांवनोकरांचें वेतन, व इतर मुशाहिरा—गांवनोकरांचे प्रकार—भारतीय ग्रामरचना ही चिमुकलीशी राज्यसंस्थाच होय—तिची व्याप्ति, तिचें प्रातिनिधिकत्व, व स्वावलंबन—बलोतेंदार व अलोतेंदार—भारतीय संस्थांचें आनुवंशिकत्व—परकीयांचा अम्मल व ग्रामसंस्थांचा ऱ्हास—ग्रामसंस्थेपासून भारतीयांचें हित.

# भारतीय साम्राज्य.

पूर्वार्ध.

## पुस्तक पांचवें.

आर्यशासनपद्धति, व संस्था.

# भाग ३२ वा.

## आर्यांची राज्यव्यवस्था.

आर्यांची फार प्राचीन काळापासून आजपर्यंत चालत आलेली राज्यपद्धति.

आमच्या भरतखंडाची सनातन राज्यपद्धति म्हटली म्हणजे राजनियंत्रित प्रजा होय. आणि ही फार प्राचीन काळापासून, एकसारखी व जशीच्या तशीच, आजपर्यंत चालत आली आहे आर्यांच्या मूळनिवासस्थानांत, ते पृथक् पृथक् व अगदीं स्वतंत्रपणें राहत असत. तथापि, त्या प्रत्येक शाखेचा एक मोहो-

रका किंवा पुढारी असून, त्या सर्व शाखां मिळून सर्वांनुमतें पसंत केलेला एक अधिपति असे. अशा मनुष्याची प्रमुखस्थानीं योजना करण्यांत, त्या वेळचे **आर्य** चांगलाच विचार करीत असल्यामुळें, हा निवडलेला सेनानायक पराक्रमशील असून नीतिमान असे; साहसी असून सदाचारी असे; व धैर्यवान् असून विचारवंत असे. आणि कधीं कधीं तर, ऐहिक व पारमार्थिक ज्ञानांत सुद्धां तो फार

तिची पीठिका.

निपुण असे. आतां, समाजाच्या नूतन किंवा प्रथमावस्थेंत, फक्त शौर्य हा एकच गुण कोणाच्या अंगांत वास करीत असला तरी देखील त्याला आधिपत्य मिळण्यास अडचण पडणार नाहीं. मग, सदरी लिहिलेल्या सर्व गुणेंकरून जो नरपुंगव अलंकृत असेल, त्याला प्रभुत्व मिळण्यास काय उशीर? याप्रमाणें, ह्या **आर्याधिपती**स साहजीकच नृपत्व प्राप्त होऊन, तो **आर्यां**चा नरपति बनला. आणि हीच परंपरा, आज सुमारें आठ दहा हजार वर्षांच्या ऐतिहासिक घडामोडींत, आज दिनपर्यंत सतत चालत आली आहे.

राजसत्ता.

ह्या लोकनिर्मित **प्रभू**ची बहुत करून अनियंत्रित सत्ता असे. तथापि, तो स्वतः ज्ञानसंपन्न आणि विवेकी असल्यामुळें, तो आपल्या अधिकाराचा प्रायः कधींच दुरुपयोग करीत नसे. क्वचित् प्रसंगी, हा नरपति ज्ञानहीन असल्या कारणानें

विचारशून्यही असे. तथापि, त्याला आमच्या **धर्माध्यक्षांचें** बाह्य बंधन, व **पारमार्थिक** शासनाचें अंतर्गत बंधन असल्यामुळें, त्याच्या हातून अन्याय किंवा अनीतीचें आचरण होण्याचा अगदींच कमी संभव असे.

राजतेज.

राजा ह्मणजे **ईश्वरी** अंश, असेंच पूर्वीपासून आमचे लोक मानीत आले आहेत. आणि प्रायः, ही समजूत पृथिवीच्या पाठीवरील प्रत्येक राष्ट्रांत अजून देखील आहे, असें ह्मणण्यास कांहींच हरकत नाहीं. कारण, हरएक प्रकारचें कल्याण किंवा हानि करण्याचें राजाच्या हातांतच असल्यामुळें, **ईशशक्ती**प्रमाणेंच त्याचें तेज सर्वत्र भासूं लागतें. आतां, मानवी स्थितींत ज्या मानानें फेरबद्दल होतो, ह्मणजे मनुष्याचें पाऊल जसजसें पुढें सरकतें, व त्याचें ज्ञान दिवसानुदिवस जास्त प्रगल्भ होऊन, राजा आणि प्रजा यांच्या मधलें खरें इंगित, व भेदबुद्धि, जितक्या प्रमाणानें त्याला हळूहळू कळूं लागते, तितक्याच प्रमाणानें, त्याला राजांतील **ईश्वरी** अंश मुळींच भासेनासा होतो. आणि वास्तविक पाहतां, असें वाटणें देखील साहजीकच आहे. कारण, वस्तुतः राजा ह्मटला ह्मणजे प्रजानिर्मितच **प्रभु** होय.

प्रजाप्रभुत्व.

तेव्हां उघडच, **प्रजा** ही जेवढे म्हणून आपले हक्क **राजास** देईल, तेवढ्यांचाच उपभोग घेण्यास तो पात्र होईल. आपल्या

अधिकाराचा चांगला उपयोग करून, प्रजाजनांचें सर्व-प्रकारें पालन करील व त्यांचें वात्सल्य संपादील, असा हेतु मनांत धरूनच आपले एकवट झालेले हक्क **प्रजाही** मोठ्या प्रेमभावानें व आदरपूर्वक **राजा**ला देत असते. आणि अशा हक्कांचा सदुपयोग करणें, हेंच राजाचें पहिलें कर्तव्यकर्म होय.

प्रजा प्रभुत्वाचें पृथक्करण.

" **राजा बोले आणि दळ हलें** " ह्मणून जी आपल्यांत ह्मण आहे, ती राजाच्या शक्तीची द्योतक होय. पण ही शक्ति, व अशा प्रकारचें **कर्तुम्, अकर्तुम्, अन्यथा कर्तुम्**, इत्यादि प्रचंड सामर्थ्य, मूळचें राजाचें नव्हें. तें निःसंशय लोकसंघाचें एकवटलेलें तेज होय. हें जितक्या प्रमाणानें पृथक् पृथक् वास करितें, तितक्याच प्रमाणानें त्याचें सामर्थ्य अगदीं संकुचित असतें. किंबहुना, तें बिलकुल नसतेंच, असें देखील ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. ज्याप्रमाणें, प्रत्येक किरणाचें निराळें झालेलें तेज बिलकुल दाहक किंवा दीप्तिमय नसून, फक्त एकत्र झालेलीं किरणेंच सूर्याप्रमाणें तेजःपुंज भासतात; त्याप्रमाणेंच, प्रजेची प्रत्येक व्यक्ति पृथक् पृथक् घेतली तर, त्या निरनिराळ्या झालेल्या व्यक्तीचा यत्किंचितही प्रभाव भासमान होत नसून, त्याच व्यक्तीची एकरूपता होतां क्षणींच, त्यांची शक्ति आपोआपच दिसूं लागते.

अधिकार समुच्चय व

अशा प्रकारें पृथक् पृथक् वांटलेली शक्ति एकवट करून, जी प्रजेनें अत्युदार बुद्धीनें राजास दिली, तिलाच आपण **अधिकारसमुच्चय** अशी संज्ञा देऊं. हा अधिकारसमुच्चय प्रजेच्या मोठ्या प्रीतीची व जिवाची अमुल्य ठेव होय. आणि ह्मणूनच ह्या ठेवीचें योग्य संगोपन, राजानें फार काळजीपूर्वक व विश्वासानें, अवश्य केलें पाहिजे.

प्रजा ही राजाला पितृवत् मानीत असल्या कारणानें, राजानें तिचें पुत्रवत् पालन केलें पाहिजे. तिच्या ज्या ज्या गरजा असतील त्या त्या त्यानें भागविल्या पाहिजेत; तिच्या अडचणी दूर केल्या पाहिजेत; तिच्या दुःखाचें उपशमन केलें पाहिजे; आणि तिच्या सुखोपभोगाकडे सर्व प्रकारें त्यानें चांगलें लक्ष्य पूरविलें पाहिजे.

लोकमत.

**प्रजाजना**चा अधिकार केवढा प्रचंड आहे, व **लोकमताला** मान देऊन, त्याचा आदरपूर्वक कसा स्वीकार केला पाहिजे, याविषयीं फारच मार्मिक विवेचन **आंग्ल** देशांतील सुप्रसिद्ध वक्ता **बर्क** यानें केलें आहे. तो असें ह्मणतो कीः—

"The people are the masters. They have only to express their wants at large and in gross. We are the expert artists; we are the skilful workmen, to shape their desires into perfect form, and to fit the utensil to the use. They are the sufferers, they

tell the symptoms of the complaint; but we know the exact seat of the disease, and how to apply the remedy according to the rules of art. How shocking would it be to see us pervert our skill into a sinister and servile dexterity for the purpose of evading our duty, and *defrauding our employers, who are our natural lords,* of the object of their just expectations† ! "

दुसऱ्या एके ठिकाणीं, हा उदारधी असें लिहितो कीं, लोकमतावर कोणत्याही प्रकारचा दाब न ठेवितां, त्यांच्या कलास अनुसरूनच जें करणें तें केलें पाहिजे. मात्र इतकेंच कीं, त्या मतास आपण वेळोवेळीं शुद्ध वळण दिलें पाहिजे.

" In effect, to follow, not to force, the public inclination; to give a direction, a form, a technical dress, and a specific sanction, to the general sense of the community,—is the true end of‡ legislature."

यासाठीं, ज्या राजास आपल्या प्रजेकडून " प्रजा-पालनदक्ष " असा किताब मिळवून घेण्याची इच्छा असेल, त्यानें लोकमताचा बिलकुल अनादर करतां कामा नये. इतकेंच नाहीं तर, लोकमताचा कांटा कोणीकडे झुकतो आहे हें पाहून, त्या दिशेचेंच त्यानें अवश्य अवलंबन

† Burke's Works. Vol. I. P. 254.
Letter to the Sheriffs of Bristol.
Burke's Works. Vol. I. P. 254.

करावें; आणि त्यास कोणत्याही प्रकारचें प्रतिबंधन न होई, अशी तजवीज ठेवावी. कारण, तसें केलें तरच त्यापासून फायदा होऊन, नुकसान होण्याचा संभव पुष्कळच कमी असतो.

"It would be dreadful, indeed if there was any power in the nation capable of resisting its unanimous desire, or even the desire, of any very great and decided majority of the people. The people may be deceived in their choice of an object. But I can scarcely conceive any choice they can make to be so very mischievous, as the existence of any human force capable of resisting it.†" * * * *

"On this occasion I give way to the present Bill, not because I approve of the measure in itself, but because I think it prudent to yield to the spirit of the times. The people will have it so; and it is not for their representatives to say nay. I cannot, however, help entering my protest against the general principles of policy on which it is supported because I think them extremely dangerous‡."

---

† Letter on the duration of Parliament.
Burke Vol. II. P. 430.

‡ Parliamentary History. Vol. XVII. P. 480.
Burke's speech.

लोकमताच्या अनादरामुळें, पदच्युत होण्याची भीति.

एतावता, इतकी गोष्ट सिद्ध आहे कीं, ज्या वस्तूचा जो मालक, त्याच्या मर्जीप्रमाणेंच त्या वस्तूची व्यवस्था केली पाहिजे. ज्याची जी ठेव, त्याच्या इच्छेनुरूपच त्या ठेवीचा विनियोग झाला पाहिजे. आणि ज्यांचा जो अधिकार, त्यांच्या मनाप्रमाणेंच तो अमलांत आणिला पाहिजे. परंतु अशा अधिकाराचा दुरुपयोग करून राजा प्रजेकडे दुर्लक्ष करील, किंवा प्रजेच्छेचें अमर्यादपणें उल्लंघन करून त्यांचा छल करील, तर त्याचें प्रायश्चित्त त्यास खचित भोगावें लागेल. इतकेंच नाहीं तर तो पदच्युत झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं. व ज्या ज्या ठिकाणीं आणि ज्या ज्या प्रसंगीं राजानें लोकांवर जुलुम करून प्रजापीडन केलें, किंवा अति निंद्य कर्म आचरिलें, त्या त्या वेळीं प्रजेनें राजाचें शासन केल्यावांचून कधींही ठेविलें नाहीं. ह्या गोष्टीवरून इतकें खचित लक्षांत येण्यासारिखें आहे कीं, तत्वदृष्ट्या राजा ह्मणजे प्रजाजनांपैकींच एक मनुष्य असून, इतर प्रजावर्गाप्रमाणेंच त्याच्यांतही बुद्धिवैभवादिगुणांचें न्यूनाधिकत्व दिसून येतें; आणि त्या कारणानेंच राजा ह्मणजे **ईश्वरी** अवतार, असें मानण्यास सर्वथैव अडचण वाटते. तथापि, शासनपद्धतीसाठीं, कोणी तरी नियंता अथवा शास्ता असणें अगदीं अवश्य आहे, यांत संशय नाहीं.

शास्त्याची अवश्यकता.

कारण, एकंदर सृष्टिक्रम पाहून तत्संबंधीं लक्षपूर्वक विचार केला तर, असें खचित् दिसून येईल कीं, हा जगड्वाळ कारखाना, व ही प्रचंड आणि अद्भुत घडामोड, अगदीं नियमित रीतीनें चालली आहे. इतकेंच नाहीं तर, त्यांत पूर्ण व सर्व प्रकारची व्यवस्थाही अगदीं अबाधित आहे. आणि ह्यावरूनच असेंही अनुमान होतें कीं, सामाजिक व्यवस्था सुरळीत चालून ती सर्वत्र सारखी राहण्यासाठीं, कोणी तरी नियंता अथवा शास्ता असणें अवश्य आहे. आणि तो असेल तरच, जीव संरक्षण होऊन शांतता वाढेल; धनसंगोपनाची बिलकुल काळजी राहणार नाहीं; नीतीचा प्रसार चोहोंकडे होईल; दुराचरण लयास जाईल; व धर्मसंस्थांचें बीजारोपण होऊन, विद्याविलास ठायीं ठायीं दृष्टीस पडेल. नाहींपेक्षां, जिकडे तिकडे एकच गोंधळ होऊन भ्रष्टाकार माजेल. बेबंदनगरी आणि झोटिंग पादशाही सुरू होईल. जो तो दुसऱ्यास लुटण्याची इच्छा धरून, आपण आळशी व कफल्लक राहील. मनुष्यास आपापल्या श्रमाचें आणि उद्योगाचें फळ कधींही भोगावयास सांपडणार नाहीं. आणि असें झालें म्हणजे सहजींच सर्वत्र हाहाःकार होऊन, सुधारणेचें पाऊल मागें पडेल.

ह्या सर्व गोष्टींचा विचार आमच्या **आर्यांनीं** प्रथमपासूनच केला होता. इतकेंच नाहीं तर, **राजा** आणि

आर्यांचें तत्संबंधीं दूरदार्शित्व.

**प्रजा** यांचे परस्पर धर्म, त्यांची इतिकर्तव्यता, त्यांचें बलाबल, व एकंदर राजकीय व्यवहार, याविषयीं सविस्तर विवेचन त्यांनीं आज सुमारें पांच सहा हजार वर्षांपूर्वींच केलेलें दिसून येतें. त्यावरून आमची प्रजापरिपालनदक्षता, शासन परिशिलन, आणि ततसंबंधीं पौराणत्व, हीं कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहींत.

मनुस्मृति.

**धर्मशास्त्रा**चीं मूलतत्वें ज्यांत विकीर्ण झालीं आहेत, असे ग्रंथ अनेक[1] आहेत. परंतु ज्यांत पद्धतशीर विषयविन्यास आहे असा अति प्राचीन ग्रंथ म्हटला म्हणजे **मनुस्मृति** होय. हा प्रसिद्ध स्मृतिकार इ० स० पूर्वीं सुमारें एक हजार[2] १००० वर्षें होऊन गेला असून, त्यानें मानवी धर्मासंबंधीं सर्व विवे-

---

१ धर्म शास्त्राची मूळ खाण म्हटली म्हणजे वेदांतील गृह्यसूत्रें होत. तदनंतर, सामयाचारिक नांवाचीं अपस्तंब श्रौत सूत्रें, व गौतम, विष्णु, वशिष्ठ, बौध्यायन, इत्यादिकांचीं धर्मसूत्रें उदयास आलीं; आणि उशनस्, काश्यप, बुद्ध, हारीत, इत्यादि स्मृतिकार होऊन गेले.

2. "Schlegel was confident that it (Manu's date) could not be later than 1,000 B. C."

(Dr. Hunter's Indian Empire.)

सरविल्यम् जोन्स यांच्या मतें मनूचा काल, इ० स० पूर्वी १२५० पासून ५०० वर्षें पर्यंत असावा.

चन केलें आहे. प्रथमतः जगदुत्पत्तीचें आदिकारण सांगून क्रमाक्रमानें त्यानें राजधर्मांचे सर्व प्रकार लिहिले आहेत.

अराजकेहि लोकेस्मिन सर्वतो विद्रुते भयात् ।
रक्षार्थमस्यसर्वस्य राजानमसृजत् प्रभुः ॥ ३ ॥
सोऽग्निर्भवति वायुश्च सोऽर्कः सोमः सधर्मराट ।
सकुबेरः सवरुणः समहेन्द्रः प्रभावतः ॥ ७ ॥
बालोऽपिनावमन्तव्यो मनुष्यइतिभूमिपः ।
महती देवताह्येषा नररूपेण तिष्ठति ॥ ८ ॥
यस्यप्रसादे पद्माश्रीर्विजयश्च पराक्रमे ।
मृत्युश्चवसति क्रोधे सर्व तेजोमयोहिसः ॥ ११ ॥
दंडः शास्ति प्रजाः सर्वा दंड एवाभिरक्षति ।
दंडः सुप्तेषुजागर्ति दंडंधर्मं विदुर्बुधाः ॥ १८ ॥
सर्वोदंडजितो लोको दुर्लभो हिशुचिर्नरः ।
दंडस्यहि भयात्सर्वं जगद्भोगाय कल्पते ॥ २२ ॥

( मनुस्मृति. अ. ७ )

राजाची इतिकर्तव्यता.

ह्याप्रमाणें प्रजाजनाचें यथोचित संगोपन होण्यासाठींच राजा निर्माण झाला असून, त्याच्यांत पंचमहाभुतांचें तेज व शक्ती आहे, अशी पूर्वींच्या काळची समज होती. राजा बालक असला तथापि, तो केवळ देवतारूपच असल्यामुळें त्याचा कोणत्याही प्रकारें अवमान करूं नये, अशी सक्तीची मन्वाज्ञा आहे. राजा देखील सत्यवादी, न्यायी,

सारासार विचार करणारा, व प्रज्ञाशाली असून, धर्मार्थ-काम मोक्षादि विषयांत तो स्वतः निपुण असला पाहिजे. अशा प्रकारचा सर्वगुणसंपन्न राजा असल्यास, त्याची सर्वत्र कीर्ति होऊन प्रजा देखील सुख पावते. आणि तोच राजा दुष्ट व अविचारी असल्यास, अखिल प्रजा संत्रस्त होऊन, पुत्र व बंधु, दुर्ग व राष्ट्र, यांसहित त्याची हानि होते. ह्या करितां, राजानें, यथान्याय वर्तण्यासाठीं, आपण होऊनच प्रजेला कित्ता घालून दिला पाहिजे; आणि नित्यशः सविनय असें वर्तन ठेवून, प्रतिदिनीं त्यानें नीतिशास्त्राभिज्ञ अशा विद्वान् **ब्राम्हणां**ची सल्ला व मसलत घेतली पाहिजे. तसेंच कोणी वयोवृद्ध असून, फार अनुभविक व मर्मज्ञ असेल तर, त्याच्याही दोन गोष्टी ऐकून लोककल्याणार्थ आपली काया राजानें झिजविली पाहिजे.

विनयाचें माहात्म्य **मनुस्मृतीं**त फारच सांगितलें आहे. व तें इतकें कीं, विनयालंकृत कोणी मनुष्य असेल तर त्याला राजपदप्राप्ति होते. परंतु, तोच तत्पराङ्मुख असल्यास स्वपदभ्रष्ट होऊन, शेवटीं लयासही जातो.

**बहवोऽविनयानष्टा राजानः सपरिच्छदाः ।**
**वनस्था अपि राज्यानि विनयात् प्रतिपेदिरे ॥ ४० ॥**

( अ. ७. )

विनयाप्रमाणें इतर गुणांची देखील राजाच्या अंगीं मो-

मन्वाज्ञा.

मोठीच अवश्यकता आहे. तो आत्मविद्या, दंडनीति, व तर्कविद्या, ह्यांत निपुण असला पाहिजे. कृषिकर्म, वाणिज्य आणि पशुपालनादि क्रिया, यांत त्यानें त्या त्या प्रकारच्या माहितगार लोकांकडून, हरएक तऱ्हेचें ज्ञान संपादन केलें पाहिजे. तो रणशूर, विद्याविलासी, आणि साहसी असून, शमदमादि गुणांत निपुण असला पाहिजे. हा शेवटला गुण ज्या राजाच्या अंगीं असेल, तो खरोखर अमोलिक हिराच, असें समजण्यास हरकत नाहीं. कारण, ज्यानें आपल्या मनावर दाब ठेवून, चक्षुरादि बाह्येन्द्रियांचाही निग्रह केला, त्याचा प्रजेवर पूर्ण अम्मल बसतो. व '**यथा राजा तथा प्रजा**' या म्हणीप्रमाणें, ती देखील तदनुसारी होते. परंतु हेच गुण त्याच्यांत नसले तर, त्यापासून उलट परिणाम होतो. राजा कामान्ध असला म्हणजे अर्थातच स्त्रीलंपट असतो, आणि स्त्रीच्या ठिकाणीं कोणाचीही अतिरिक्त आसक्ति असली तर, त्याला एकाएकी चैन पडेनासें होतें. मग त्याचा अचुक परिणाम म्हटला म्हणजे, मनास वाटतील ते सूक्त असूक्त व्यापार करून, त्या मनाला येनकेन प्रकारेण रिझविणें, हा होय. मृगया करणें, अक्षादि क्रीडा खेळणें, सकलकार्यविवातिनी अशी दिवसा निद्रा घेणें, परदोष कथनानें आनंद वाटणें, निशिदिनीं स्त्रीसंभोगांत रममाण होणें, मद्यपान करणें, नृत्य गीत वाद्यादिकांत

निमग्न असणें, आणि वृथाभ्रमण करणें, यांतच विषयांध राजांचा सर्व काळ जातो. त्या योगानें प्रजा देखील व्यसनीं होऊन, त्या दोघांचेंही मातेरें होतें. परंतु ह्या, व पैशुन्य, द्रोह, ईर्ष्या, असूया, अर्थाहरण, इत्यादि सर्व दुर्गुणांपासून राजानें अगदीं अलिप्त असलें पाहिजे, म्हणून **मनुस्मृतींत** स्पष्ट आज्ञा आहे.

**दश कामसमुत्थानि तथाऽष्टौ क्रोधजानि च ।**
**व्यसनानि दुरन्तानि प्रयत्नेन विवर्जयेत् ॥ ४५ ॥**

( अ. ७. )

तसेंच, सदर्हू दोषांचें मूलकारण जो लोभ तोही राजानें सोडून देऊन, विपदावस्थेंत धैर्य, आपल्या उत्कर्ष-कालांत क्षमा, सभेंत वाक्पांडित्य, युद्धांत पराक्रम, यशाची अभिरुचि, आणि **वेदान्त** श्रवणासाठीं विशेष आसक्ति, इत्यादि त्यानें अभिव्यक्त केलीं पाहिजेत.

राजमंत्रि.

याप्रमाणें विद्येसंबंधीं राजाची स्वतःची तयारी असून, राज्यकारभारांत मदत होण्याकरितां मंत्रिमंडल व सेवक वर्ग यांचीही योग्य पारख करून, त्यानें त्यांस आपल्या हाताशीं राखिलें पाहिजे. हे मंत्री सात किंवा आठ असून, ते फार विश्वासूक

१ मौलाञ्छास्त्रविदः शूराँल्लब्धलक्षान्कुलोद्गतान् ।
सचिवान्सप्त चाष्टौ वा प्रकुर्वीत परीक्षितान् ॥ ५४ ॥
( मनुस्मृति अ. ७.)

आणि पिढीजाद असावेत. कारण, ते तसे वंशपरंपरेनें चालत आलेले असले, तरच त्यांच्या मनांत स्वप्रभूविषयीं दिवसानुदिवस जास्त प्रेम वाढत जाऊन, ते निमकहरामपणा करण्यास सहसा प्रवृत्त होत नाहींत. तसेंच हे मंत्री शूर व शास्त्रज्ञ असून, मोठ्या कुळांतले व समरांगणांत तरवार गाजविलेले असावेत, म्हणजे त्यांस दुर्धर प्रसंगाचा यत्किंचितही बाऊ न वाटतां, सोंपविलेलें कार्य ते मोठ्या हिमतीनें, उत्साहानें, व अलौकिक साहसानें तडीस नेतात. अशा प्रकारचे मंत्री पसंत केल्यावर महत्वाच्या हरएक बाबतींत राजानें त्यांची सल्लामसलत घ्यावी. आणि संधिविग्रहादि विचार, साम दाम दंड भेदादि प्रकार, प्रजाशासनपद्धति, प्रजेचें शिक्षण व पोषण, सेनारक्षण, आणि कोश व स्त्रीवर्गादिकरून एकंदर राष्ट्राचें संगोपन, ह्याविषयीं डोळ्यांत तेल घालून रात्रंदिवस राजानें [1]मनन करावें.

राजदूत.

सचिवमंडळानंतर विशेष महत्वाचा सेवक वर्ग म्हटला म्हणजे राजदूत होय. हा आपल्या कामांत अगदीं निष्णात असला पाहिजे. व हा जितका चतुर आणि मुत्सद्दी असेल, तितकें ह्याचें श्रेष्ठत्व साहजीकच जास्त असतें. कारण,

---

१ तैः सार्धं चिन्तयेन्नित्यं सामान्यं संधिविग्रहम् ।
स्थानं समुदयं गुप्तिं लब्धप्रशमनानि च ॥ ५६ ॥
( मनुस्मृति. अ. ७. )

संधिविग्रहादि कार्यांत ह्यांच्या हातीं साधारण घडामोड बहुत करून पुष्कळच असते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि क्वचित् प्रसंगीं तर ह्यांच्यावर सर्व सत्ता व जबाबदारी सोंपलेली असते; त्यामुळें, नीतिविशारद व युक्तिमान् राजदूत, प्रतिपक्षाचें इंगित हरएक प्रकारें काढून घेऊन, आपल्या पक्षाचें हित करावयास कधींही सोडीत नाहींत, व मागेंही सरत नाहींत.

**दूत एव हि संधत्ते भिनत्त्येव च संहतान् ।**
**दूतस्तत्कुरुते कर्म भिद्यन्ते येन वा न वा ॥ ६६ ॥**
**बुद्ध्वाच सर्वं तत्त्वेन परराजचिकीर्षितम् ।**
**तथा प्रयत्नमातिष्ठेद्यथाऽऽत्मानं न पीडयेत् ॥ ६८ ॥**

( मनुस्मृति. अ. ७. )

प्रजासंरक्षण.

**प्रजाजनाचें** संरक्षण होण्याच्या कामीं, **राजानें** मुख्यत्वेंकरून ज्या गोष्टी मनांत ठेविल्या पाहिजेत त्या ह्या कीं, ( १ ) शत्रूंच्या स्वाऱ्या व पारदेशिक आक्रमण, ह्यापासून आपल्या राज्याचा सर्व प्रकारें बंदोबस्त; ( २ ) आपल्या प्रजाजनाचा प्रकोप न होऊं देण्याविषयीं योग्य खबरदारी; आणि ( ३ ) आपल्या मुलुखांत शांतता राखण्याविषयीं पूर्ण दक्षता. आतां बाहेरून परचक्र येऊन राज्याची खराबी होऊं नये ह्मणून, भूपतीनें उत्तम प्रकारची तयार फौज ठेवून, ठिकठिकाणीं **दुर्गाश्रयाची**

तजवीज केली पाहिजे. हे दुर्ग[1] सहा प्रकारचे सांगितले असून, त्या सर्वांत गिरिदुर्ग हा फारच महत्वाचा असल्याविषयीं मनुस्मृतींत वर्णन आहे. कारण, प्राकारस्थ असा योद्धा शंभर असामींचा समाचार घेतो, व अशा प्रकारचे शंभर योद्धे दहा हजार इसमांस भारी होतात, यांत संशय नाहीं. मात्र अशा प्रकारच्या किल्ल्यांत सर्व प्रकारचीं आयुधें व खड्गें असलीं पाहिजेत. इतकेंच नाहीं तर, त्यांत धन, धान्य, व उदक, यांची समृद्धि असून, शिवाय करितुरगादि वाहनें, सर्व प्रकारची सामग्री, नाना प्रकारचीं यंत्रें, आणि तत्संबंधीं कारागीर, यांची रेलचेल असली पाहिजे. व साधारणपणें ज्या ज्या वस्तूंची ह्मणून अशा ठिकाणीं जरूर लागेल त्या त्या वस्तु ताबडतोब उपलब्ध होतील, अशी चांगली तरतूद अवश्य राखली पाहिजे. नाहीं तर, शत्रूचा वेढा पडल्यावर सामग्री खुटल्यास सर्वांची दाणादाण होऊन तोंडचें पाणी पळेल; व सर्वत्र हाहाकार होऊन साम्नेवाल्याला शरण जाण्याची पाळी येईल.

बाह्य परचक्राचा बंदोबस्त.

---

१ धनुर्दुर्गं महीदुर्गमब्दुर्गं वार्क्षमेव वा ।
नृदुर्गं गिरिदुर्गं वा समाश्रित्य वसेत्पुरम् ॥ ७० ॥
सर्वेण तु प्रयत्नेन गिरिदुर्गं समाश्रयेत् ।
एषां हि बाहुगुण्येन गिरिदुर्गं विशिष्यते ॥ ७१ ॥
( मनुस्मृति अ. ७. )

अंतःसंक्षोभ न होण्याविषयीं तजवीज.

अशा प्रकारें सर्व तऱ्हेची कडेकोट तयारी असली म्हणजे, बाह्योपप्लवाची भीति सहसा राहत नाहीं. आणि अर्थातच, ही भीति कमी झाली म्हणजे प्रजेच्या सुखोपभोगाकडे चांगलें लक्ष पोहोंचविण्यास साहजीकच पुष्कळ अवधि राहते. अशा शांततेच्या वेळीं राजानें फारच झटून खुनी, दरोडेखोर, व चोर लोकांचा बंदोबस्त करून, दुराचारी आणि विषयी, धर्मभ्रष्ट व कुमार्गी, तसेंच व्यसनीं आणि मदांध, इत्यादि सर्व लोकांचा खरपूस समाचार घेतला पाहिजे. नाहीं तर, षड्भाग करभार देणाऱ्या प्रजेचें मन क्षुब्ध होऊन, राज्यांत बंडावा माजेल. सबब, त्याचा बंदोबस्त होण्याकरितां, आपल्या प्रजेचें मन हरएक प्रकारें राजी राखून, राज्यांत चिरकाल शांति राहिल असा प्रयत्न राजानें सतत केला पाहिजे.

शांततेचे उपाय.

देशांत खरोखर चांगली स्वस्थता व शांतता रहावी एतदर्थ अपराधी, पातकी, आणि दुराचारी, यांचें उत्तम प्रकारें निर्मू-

१ रक्षणादार्यवृत्तानां कंटकानां च शोधनात् ।
नरेंद्रास्त्रिदिवं यान्ति प्रजापालनतत्पराः ॥ २५३ ॥
अशासंस्तस्करान्यस्तु बलिं गृह्णाति पार्थिवः ।
तस्य प्रक्षुभ्यते राष्ट्रं स्वर्गाच्च परिहीयते ॥ २५४ ॥
( मनुस्मृति. अ. ९ )

रून होऊन, जेणेंकरून स्वराज्य चिरकाल निष्कंटक राही ल अशी तजवीज विचारी भूपतीनें जरूर ठेविली पाहिजे. एतत्संबंधीं नानाविध उपाय, व चोर तस्कर निवारणार्थ पटुतर कल्पनाचातुर्य, मनुस्मृतींत चांगल्या प्रकारें दिसून येतें. त्यावरून तत्कालीन आर्यांच्या दूरदर्शित्वाचें उत्तम प्रकाशन होऊन, आज सुमारें तीन हजार वर्षांमागें देखील, सुधारणा व राज्यधुरीणत्व, धनसंरक्षण व जीवितसंरक्षण, प्रजासंगोपन व प्रजापालन, इत्यादि संबंधानें आमचें पाऊल इतर सर्व राष्ट्रांपेक्षां किती पुढें होतें, ह्याचें चांगलें दिग्दर्शन झाल्यावांचून खचित राहत नाहीं.

साम, दाम, दंड, व भेद.

असो. स्वकीय राज्यांत हरएक प्रकारें शांतता राखण्यासाठीं राजानें साम, दाम, दंड, आणि भेद, ह्या चारही उपायांची प्रसंगानुसार योजना केली पाहिजे. तथापि होतां होईं तोंपर्यंत संग्रामाची वेळ न येई, असें धोरण राखिलें पाहिजे. परंतु शत्रु फारच उन्मत्त झाल्यामुळें शिरजोर

१ मनुस्मृति. अ. ७।८।९.

२ साम्ना दानेन भेदेन समस्तैरथवा पृथक् ।
विजेतुं प्रयतेतारीन्न युद्धे न कदाचन ॥ १९८ ॥
अनित्यो विजयो यस्माद्दृश्यते युद्ध्यमानयोः ।
पराजयश्च संग्रामे तस्माद् युद्धं विवर्जयेत् ॥ १९९ ॥

(मनुस्मृति अ. ७)

झाला असल्यास, किंवा, त्याचें वेळींच शासन झालें नाहीं तर तो डोईजड होईल असें वाटत असल्यास, त्याचें पारिपत्य अवश्य करावें. मात्र, आपलें व शत्रूचें बलाबल जाणून, व अमात्य, सैन्य, आणि धनादि सामग्री, यांचें चांगलें पाठबळ असल्या कारणानें आपली खचित सरशी होईल, असें वाटत असल्यास लढाईच्या भरीस पडावें; आणि उचितकाल[1] पाहून शत्रूवर हल्ला करावा.

उचितकालीं शत्रूवर चाल.

तदनंतर सपाट जागीं अश्वरथादि साधनांनीं युद्ध करावें. अथवा, उदकावृतस्थानांत गजनौकादिक साधनांनीं, किंवा, वृक्षादि लतांची गर्दी असल्यास चापेंकरून, आणि उघड्या ठिकाणीं, ढाल तलवारीनें लढण्याची सर्व तयारी असावी[2].

सैन्यांत लढण्यासाठीं जे लोक ठेवावयाचे ते धिप्पाड, व

१ मार्गशीर्षे शुभे मासि यायाद्यात्रां महीपतिः ।
फाल्गुनं वाऽथ चैत्रं वा मासौ प्रतियथाबलम् ॥ १८२ ॥
अन्येष्वपि तु कालेषु यदा पश्येद्ध्रुवं जयम् ।
तदा यायाद्विगृह्यैव व्यसने चोत्थिते रिपोः ॥ १८३ ॥

२ स्यन्दनाश्वैः समे युद्धेदनूपे नौद्विपैस्तथा ।
वृक्षगुल्मावृते चापैरसिचर्मायुधैः स्थले ॥ १९२ ॥
( मनुस्मृति. अ. ७ ).

युद्धासाठीं, लढवय्ये लोकांची सैन्यांत भरती.

मजबूत असावेत. आणि असे लोक बहुतकरून **भरतखंडा**च्या उत्तरेकडील भागांत उपलब्ध होत असल्यामुळें तिकडूनच त्यांची होता होईं तों भरती करावी. तथापि, इतर ठिकाणचे लोक देशाभिमानी, शूर, व पाणीदार असल्यास, त्यांस देखील लढवय्ये बनवावे. **उत्तरहिंदुस्थानां**तील शिपाई लढवय्ये असल्याविषयीं ज्याप्रमाणें हल्लीं प्रसिद्धि आहे, त्याप्रमाणेंच फार प्राचीनकाळीं देखील मोठी आख्या होती. कारण, **कुरुक्षेत्र**, **मत्स्यदेश**, **पांचालदेश**, व **शूरसेन**, इत्यादि देशांतून मोठ्या आणि पृथुवक्षस्थळाचे योध्ये शोधून काढण्याविषयीं, **मनुस्मृतीं**त उल्लेख आहे.

**कुरुक्षेत्रांश्च मत्स्यांश्च पंचालाञ्शूरसेनजान् ।**
**दीर्घांल्लंघूंश्चैव नरानग्रानीकेषु योजयेत् ॥ १९३ ॥**

( अध्याय ७ )

सैन्याचे विभाग व त्यांचें आधिपत्य.

अशा योद्धयांची व पराक्रमी पुरुषांची चमू सिद्ध झाल्यानंतर, एकंदर सेनासमूहावर चांगली देखरेख रहावी एतदर्थ, त्याचे नियमित विभाग करून, त्या प्रत्येकावर योग्यतेनुरूप अधिपति नेमावे ह्मणून **स्मृति**वचन आहे. एक रथ, एक गज, तीन घोडेस्वार, आणि पांच पायदळ, यांचें आधिपत्य ज्याच्याकडे असतें त्याला

पत्तिक अशी संज्ञा असून, अशा दहा पत्तिकांवर जो मुख्य असतो त्याला सेनापति, आणि अशा दहा सेनापतीवर ज्याचा अम्मल असतो त्याला सेनानायक असें म्हणतात. याप्रमाणें सर्व प्रकारची कडेकोट तयारी झाल्यावर, (१) दंड, (२) शकट, (३) वराह, (४) मकर, (५) सूची, आणि (६) गरुड, इत्यादि नाना प्रकारचे व्यूह प्रसंगानुसार रचून, शत्रूवर चाल करावी; आणि सर्व सेनेला स्फुरण येऊन आपलें काम फत्ते होण्यासाठीं, वीर्यश्रीचीं भाषणें व जयघोष करून, शत्रूची दाणादाण करून टाकावी.

व्यूहरचना.

प्रहर्षयेद्बलं व्यूह्य तांश्च सम्यक्परीक्षयेत् ।
चेष्टाश्चैव विजानीयादरीन् योधयतानपि ॥ १९४ ॥
उपरुध्यारिमासीत राष्ट्रं चास्योपपीडयेत् ।
दूषयेच्चास्य सततं यवसान्नोदकेन्धनम् ॥ १९५ ॥
भिंद्याच्चैवतडागानि प्राकारपरिखास्तथा ।
समवस्कन्दयेच्चैनं रात्रौ वित्रासयेत्तथा ॥ १९६ ॥

( मनुस्मृति. अ. ७ )

असो. वध्यावध्य विचारांत हिंदूंची अनुकंपा खरोखर अनुकरणीय आहे. तसेंच, धर्मयुद्ध करण्याच्या संबंधानें देखील त्यांनीं केलेले नियम प्रशंसनीय आहेत.

वध्यावध्य विचारांत हिंदूंची अनुकंपा.

---

मनुस्मृति. अ. ७ श्लोक. १८७

विषयुक्त किंवा कपट शस्त्रांनीं प्रहार करण्याविषयीं सक्त मनाई आहे. आणि क्लीब, शरण आलेला, शस्त्ररहित, शोकप्रहारादि कारणांनीं व्याकुल झालेला, सुप्त, नग्न, भयपीडित, जखमी, व जो युद्ध पराङ्मुख झालेला असेल, त्या सर्वांस बिलकुल हात लावूं नये, व त्यांस न मारणें हाच उत्तम क्षत्रिय धर्म होय, अशी स्पष्ट **मन्वाज्ञा** आहे. व ह्या दयाशील अशा **पौरस्त्य** नियमनाची **पाश्चात्य** देखील फार तारीफ करितात.

---

१ न कूटरायुधैर्हन्यायुद्धमानो रणे रिपून् ।
न कर्णिभिर्नापि दिग्धैर्नाग्निज्वलिततेजनैः ॥ ९० ॥
न च हन्यात्स्थलारूढं न क्लीबं न कृतांजलिम् ।
न मुक्तकेशं नासीनं न तवास्मीति वादिनम् ॥ ९१ ॥
न सुप्तं न विसन्नाहं न नग्नं न निरायुधम् ।
नायुध्यमानं पश्यन्तं न परेण समागतम् ॥ ९२ ॥
नायुधव्यसनप्राप्तं नार्तं नातिपरिक्षतम् ।
न भीतं न परावृत्तं सतां धर्ममनुस्मरन् ॥ ९३ ॥

( मनुस्मृति. अ. ७ ).

2 " The laws of war are honourable and humane. Poisoned and mischievously barbed arrows, and fire arrows, are all prohibited. There are many situations in which it is by no means allowable to destroy the enemy." " Among those who must always be spared are unarmed or wounded men, and those

( पुढें चालू )

जिंकलेल्या देशाची व्यवस्था करण्याच्या संबंधानें देखील, आमच्या धर्मशास्त्रांतील विचार फारच उदार आणि पोक्त दिसतात. विजयश्री प्राप्त होण्याच्या कामीं ज्यांनीं ज्यांनीं म्हणून पराक्रम केले असतील, किंवा जे जे सहाय्यभूत झाले असतील, त्या सर्वांस भरपूर व योग्य बक्षिस देऊन, केलेल्या सर्व अपराधाबद्दल, अखिल प्रजाजनास अभयवचन दिल्याविषयीं, एकदम सर्वत्र दवंडी

जिंकलेल्या देशाची व्यवस्था.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

who have broken their weapen, and one who asks his life, and one who says, " I am thy captive. Other prohibitions are still more generous.: a man on horseback or in a chariot is not to kill one on foot; nor is it allowed to kill one who sits down fatigued, or who sleeps, or who flees, or who is fighting with another man. "

( Elphinstone's History of India. ) P. 47.

१ जित्वा संपूजयेद्देवान् ब्राह्मणांश्चैव धार्मिकान् ।
प्रदद्यात्परिहारांश्च ख्यापयेदभयानि च ॥ २०१ ॥
सर्वेषां तु विदित्वैषां समासेन चिकीर्षितम् ।
स्थापयेत्तत्र तद्वंश्यं कुर्याच्च समयक्रियाम् ॥ २०२ ॥
प्रमाणानि च कुर्वीत तेषां धर्म्यान्यथोदितान् ॥
रत्नैश्च पूजयेदेनं प्रधानपुरुषैः सह ॥ २०३ ॥

( मनुस्मृति. अ. ७. )

पिटवावी, जाहिरनामे लावावे, आणि चांगली प्रसिद्धि करावी, अशी स्पष्ट **मन्वाज्ञा**[1] आहे. तदनंतर, पराजित प्रजेच्या धर्माचें संरक्षण होण्यासाठीं काळजीपूर्वक लक्ष ठेवून, नवीन काबीज केलेल्या प्रांतांतील नागरिक हे आज्ञाधारक आणि वश झाले असल्यास, सर्व मंत्रिवर्गाच्या सल्ल्यानें त्यांजवर अम्मल चालविण्याकरितां, आपला **मांडलिक** ह्मणून एक तद्वंशज राजपुत्र गादीवर बसवावा. आणि तत्संबंधीं राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें आपल्या हातीं ठेवून, त्याचें सर्व प्रकारें कल्याण होईल अशी दक्षता बाळगावी. आमच्या **आर्यां**ची ही प्राचीन काळची राजनीति, आणि सांप्रतची **आंग्ल** प्रभूंची राजनीति, यांची सूक्ष्म दृष्टीनें तुलना केली तर, असें खचित दिसून येईल कीं, **पौरस्त्य** देशांतील राजकीय व्यवस्थेचें अनुकरण

---

1 " The settlement of a conquered country is conducted on equally liberal principles. Immediate security is to be assured to all by proclamation. The religion and laws of the country are to be maintained and respected; and as soon as time has been allowed for ascertaining that the conquered people are to be trusted, a prince of the old royal family is to be placed on the throne, and to hold his kingdom as a depedence on the conqueror. "

( Elphinstone's H. of India ).
P. P. 47--48.

पाश्चात्य देशांतील इंग्रज लोकांनीं, बऱ्याच बाबतींत, पुष्कळ अंशीं चांगलें केलें आहे.

युद्धाजित द्रव्य.

रणांत उपलब्ध झालेल्या धनाविषयीं देखील सविस्तर नियमन मनुस्मृतींत[1] केल्याचें दिसून येतें. "उद्धार" म्हणजे उत्कृष्ठ धन, तसेंच सोनें, रुपें, इत्यादि मौल्यवान् आणि इतर हीणकस धातु, व हत्ती, घोडे, रथ, छत्र, वस्त्रादि भूषणें, आणि स्त्रिया, इत्यादि सर्व राजाचाच भाग असून, त्या व्यतिरिक्त जें कांहीं राहील तें राजानें ज्या त्या शूर पुरुषाच्या पराक्रमाप्रमाणें, ज्याला त्याला यथान्याय वांटून द्यावें.

खर्चासाठीं करभाराची व्यवस्था.

असो. याप्रमाणें अन्य देश काबीज करून, स्वमुलुखांत व परमुलुखांत शांतता झाल्यावर, राजानें आपल्या मंत्रिमंडळाशीं कपटानें[2] न वर्ततां, एकदिलानें राज्यांतील अंतःस्थिति सुधारण्याच्या कामास एकदम लागावें. आतां, अशा प्रकारच्या कामीं, सर्वत्र बंदोबस्त राखण्या-

१ रथाश्वं हास्तिनं छत्रं धनं धान्यं पशून्स्त्रियः ।
सर्वद्रव्याणि कुप्यं च यो यज्जयति तस्य तत् ॥ ९६ ॥
राज्ञश्च दद्युरुद्धारमित्येषा वैदिकी श्रुतिः ।
राज्ञा च सर्वयोद्धेभ्यो दातव्यमपृथग्जितम् ॥ ९७ ॥
२ अमाययैव वर्तेत न कथंचन मायया ।
बुद्ध्येतारिप्रयुक्तां च मायां नित्यं स्वसंवृतः ॥ १०४ ॥
( मनुस्मृति. अ. ७ )

साठीं, पैशाची मदत भरपूर पाहिजे. सबब आपल्या प्रजावर्गीपैकीं कोणाकडून किती करभार घेणें अवश्य आहे, हें यथान्याय ठरविण्यास, त्यानें काळजीपूर्वक झटावें. राजानें कोणापासून किती घ्यावें याविषयीं **मनुस्मृतींत** चांगलें विवेचन केलें आहे.

धंदेवारी प्रमाणें कराचा यथान्याय विभाग.

मूळच्या ठेवांत सुवर्णादि मौल्यवान्[1] धातु, रत्नादि मणि आणि अश्वादि पशु, यांची जी भर प्रतिवर्षी पडेल, तिचा ($\frac{1}{50}$) एक पन्नासांश; जें धान्य पिकेल त्याचा, (जमिनीच्या मगदुराप्रमाणें व प्रसंगास अनुसरून), ($\frac{1}{12}$) एक बारांश, ($\frac{1}{8}$) एक अष्टमांश, किंवा ($\frac{1}{6}$) एक शष्ठांश; पत्रें[2], शाक, तृण, वृक्ष, मांस, मध, घृत, गंध, औषधि, रस, पुष्प, मूल, चर्मपदार्थ, आणि मृत्तिकेची व दगडाची भांडीं, इत्यादिकांवर ($\frac{1}{6}$) एक शष्ठांश; व्यापार करणाऱ्यांकडून त्यांच्या वर्षाच्या प्राप्तीप्रमाणें थोडा बहुत[3]

१ पंचाशद्भाग आदेयो राज्ञा पशुहिरण्ययोः ।
धान्यानामष्टमो भागः षष्ठो द्वादश एव वा ॥ १३० ॥

२ आददीताथ षड्भागं द्रुमांसमधुसर्पिषाम् ।
गंधौषधिरसानां च पुष्पमूलफलस्य च ॥ १३१ ॥
पत्रशाकतृणानां च चर्मणां वैदलस्य च ।
मृन्मयानां च भांडानां सर्वस्याश्ममयस्य च ॥ १३२ ॥

३ यत्किंचिदपि वर्षस्य दापयेत्करसंज्ञितम् ।
व्यवहारेण जीवंतं राजा राष्ट्रे पृथग्जनम् ॥ १३७ ॥
( मनुस्मृति अ. ७ ).

अंश; कारागीर, सुतार, सोनार, लोहार, व भारवाहक, यांजकडून दर महिन्यास एक[1] दिवसाची कामगिरी; मोठमोठे वखारदार यांजकडून (१/२०) एक[2] विसांश; याप्रमाणें कर घेण्याविषयीं **स्मृति**कारांचें वचन आहे.

जकात, व दस्तुरी.

जाण्यायेण्याच्या साधनासंबंधीं रस्त्यांवरील[3] जकात, जलमार्ग[4] संबंधीं कर, आणि ओलांड्याच्या तरी वरील दस्तुरी, याविषयीं देखील तपशीलवार नियम **स्मृति**कारांनीं करून ठेविले आहेत. गाडीचें वहन दस्तुरीच्या नाक्यावरून गेलें

---

१ कारुकाञ्छिल्पिनश्चैव शूद्रांश्चात्मोपजीविनः ।
एकैकं कारयेत्कर्म मासिमासि महीपतिः ॥ १३८ ॥
( मनुस्मृति. अ. ७ )

२ शुल्कस्थानेषु कुशलाः सर्वपण्यविचक्षणाः ।
कुर्युरर्घं यथापण्यं ततो विंशं नृपो हरेत् ॥ ३९८ ॥
( मनुस्मृति. अ. ८ )

क्रयविक्रयमध्वानं भक्तं च सपरिव्ययम् ।
योगक्षेमं च संप्रेक्ष्य वणिजो दापयेत्करान् ॥ १२७ ॥
( म. स्मृ. अ. ७ )

३ पणं यानं तरे दाप्यं पौरुषोऽर्धपणं तरे ।
पादं पशुश्च योषिच्च पादार्धं रिक्तकः पुमान् ॥ ४०४ ॥

४ दीर्घाध्वनि यथादेशं यथाकालं तरो भवेत् ।
नदीतीरेषु तद्विद्यात्समुद्रे नास्ति लक्षणम् ॥ ४०६ ॥
( म स्मृ. अ. ८ )

तर त्याबद्दल एक **पण**,[1] ह्मणजे ऐंशी कवड्या, किंवा सव्वा पैसा, अथवा सव्वा शिवराई, दिला पाहिजे; एका डोई ओझ्याला अर्धा पण; गाय, बैल, घोडा, इत्यादि जनावरें दस्तुरीवरून गेल्यास पणाचा चतुर्थांश, आणि भाररहित मनुष्यापासून पणाचा ($\frac{1}{8}$) एक अष्टमांश; याप्रमाणें करभार घेण्याविषयीं **मन्वाज्ञा** आहे.

लष्करी व मुलकी बंदोबस्त.

याप्रमाणें आपल्या राज्याची एकंदर जमाबंदी व तिची वसूल बाकी, याविषयीं यथान्याय आणि काळजीपूर्वक नियमन केल्यावर, स्वराष्ट्राचें योग्य व सुलभ रीतीनें संरक्षण होण्यासाठीं, राजानें अगदीं तयार, व उत्तम प्रकारें शिकलेली, अशी फौज राखावी. आणि ठिकठिकाणच्या जरूरीप्रमाणें, ह्मणजे दोन, तीन, किंवा पांच, अथवा शंभर गांवामिळून एक पलटण ठेवून, तिजवर एक **गुल्माधिपति** नेमावा; आणि त्या सर्वांवर योग्यतेनुरूप एका **सेनाधिपतीची** नेमणूक करावी. अशा प्रकारें **लष्करी**[2] **बंदोबस्त** झाल्यावर, ठिकठिकाणचा **मुलकी**[3]

---

१ " अशीतिभिर्वराटकैः ' पण ' इत्यभिधीयते । "( म. स्मृ. )

२ द्वयोस्त्रयाणां पंचानां मध्ये गुल्ममधिष्ठितम् ।
तथा ग्रामशतानां च कुर्याद्राष्ट्रस्य संग्रहम् ॥ ११४ ॥

३ ग्रामस्याधिपतिं कुर्याद्दशग्रामपतिं तथा ।
विंशतीशं शतेशं च सहस्रपतिमेव च ॥ ११५ ॥

( म. स्मृ. अ. ७. )

**बंदोबस्त** करण्याच्या कामीं राजानें झटावें. गांवचें काम सुरक्षित रीतीनें चालण्यासाठीं, प्रत्येक गांवांत एक **ग्रामाधिकारी** नेमावा. तदनंतर जशी अवश्यकता असेल त्याप्रमाणें दहा, वीस, शंभर, किंवा हजार, अशा गांवांवर एक मुख्य कामगार नेमून, प्रत्येकावर त्याच्या वरिष्ठाचा ताबा राही अशी व्यवस्था ठेवावी.[1]

तत्संबंधीं कामगारांचा मुशाहिरा.

तदनंतर, सदरहूप्रमाणें नेमलेल्या नोकरांचा मुशाहिरा[2] देण्याविषयीं, व त्यांनीं आपल्या वेतनाखेरीज इतर कोणत्याही कुमार्गाचें अवलंबन करूं नये ह्मणून आणि त्यांनीं लाच घेऊं नये एतदर्थ, फारच सुरेख व सविस्तर विवेचन **मनुस्मृतींत** दृष्टीस पडतें. लांच घेणारास बरीच कडक शिक्षा सांगितली असून, त्याची सर्व जिनगी व मालमत्ता जप्त करून त्यास हद्दपारही करावें, असें **स्मृतिकरांचें** वचन[3] आहे.

झाडसारवण[4] करणें, पाणी वगैरे आणणें, इत्यादि

१ मनुस्मृति. अ. ७ श्लोक ११६।११७.

२ म. स्मृ. अ. ७ श्लो. ११८।११९।१२६.

३ ये कार्यिकेभ्योऽर्थमेव गृह्णीयुः पापचेतसः ।
तेषां सर्वस्वमादाय राजा कुर्यात्प्रवासनम् ॥
(म. स्मृ. अ. ७ श्लो. १२४.)

४ पणोदेयोऽवकृष्टस्य षडुत्कृष्टस्य वेतनम् ।
षाण्मासिकस्तथाच्छादो धान्यद्रोणस्तु मासिकः ॥ १२६ ॥
(म. स्मृ. अ. ७.)

प्रकारचे हलकें काम करणारास रोज एक पण[1] देत जावा; किंवा महिन्याच्या मुशाहिऱ्यानेंच त्यास ठरविला असल्यास, त्याला द्रोण[2]भर धान्य द्यावें; किंवा त्याचा मुशाहिरा षाण्मासिक ठरला असल्यास, त्याला वस्त्रयुग द्यावें. मध्यम काम करणारास, वर लिहिलेल्या अनुक्रमानेंच तीन पण, धान्याचे तीन द्रोण, व सहा वस्त्रें द्यावीं; आणि उत्तम प्रकारचें काम करणारास अनुक्रमें सहा पण, सहा धान्याचे द्रोण, व बारा वस्त्रें द्यावीं; असें **स्मृतिकार** ह्मणतात.

चाऱ्ही पुरुषार्थ.

असो. याप्रमाणें आपल्या राज्यांतील कुलबाब, व कुलकानु, जकात व कर, मुशाहिरा व रोजमुरा, इत्यादिसंबंधीं हरएक प्रकारें व्यवस्था लावून, राजानें चिरकाल **साम्राज्य** भोगावें. तथापि, त्यानें आळशी राहून स्वस्थ बसतां कामा नये. चाऱ्ही पुरुषार्थ[3] ज्या ज्या उपायांनीं प्राप्त होतील, ते ते

---

१ अशीतिभिर्वराटकैः पण इत्यभिधीयते ॥ (म. स्मृ. ).
म्हणजे ऐंशी ( ८० ) कवड्यांचा एक पण होय.

२ अष्ट मुष्टिर्भवेत्किंचित्किंचिदष्टौच पुष्कलम् ।
पुष्कलानि च चत्वारि आठकः परिकीर्तितः ॥
चतुराठको भवेद्द्रोणः ॥　　( म. स्मृ. ).

३ अलब्धं चैव लिप्सेत लब्धं रक्षेत् प्रयत्नतः ।
रक्षितं वर्धयेच्चैव वृद्धं पात्रेषु निःक्षिपेत् ॥ ९९ ॥
अलब्धमिच्छेद्दंडेन लब्धं रक्षेदवेक्षया ।
रक्षितं वर्धयेद्वृद्ध्या वृद्धं दानेन निःक्षिपेत् ॥ १०१ ॥
( म. स्मृ. अ. ७. )

उपाय करण्याविषयीं, डोळ्यांत तेल घालून त्यांनें रात्रंदिवस झटलें पाहिजे. जें जें उपलब्ध झालें नाहीं तें तें मिळविण्यासाठीं प्रयत्न करून, जें हस्तगत झालें आहे त्याचें त्यांनें योग्य संरक्षण करावें. तसेंच, ज्याचें ह्मणून रक्षण केलें आहे, त्याची चांगली वृद्धि होईल अशी तजवीज लावून, जें फाजील राहील त्याची सत्पात्रीं योजना करावी.

राजनीति, व

अशा प्रकारची राजनीति, आणि राज्यसंरक्षणपद्धति, फार प्राचीनकाळीं देखील, ह्मणजे आज सुमारें तीन हजार वर्षांपूर्वी, **भरतखंडांत** अगदीं जारीनें सुरू होती. त्यावेळीं प्रजापालनासाठीं हरएक प्रकारची तजवीज करण्यांत येत असे. विद्यादान फारच **उत्सुकतेनें** देण्यांत येई. नीतिशिक्षण तर तारीफ करण्यासारिखेंच होई. साम, दाम, भेद, दंड, इत्यादि क्रिया आमचे पूर्वज फारच विचारानें करीत. वध्यावध्य विचारांत ते शत्रूंस विशेष अनुकंपा दाखवीत. जिंकलेल्या प्रदेशाची ते उत्तम प्रकारें व्यवस्था ठेवीत. आणि त्याप्रजेला सुख व्हावें एतदर्थ ते नानाप्रकारचे उपाय योजीत. आपल्या राज्यांत जमाखर्चाची व्यवस्था ते चांगल्या प्रकारें लावीत. व धंदेवारीप्रमाणें कराचा विभाग ते यथान्याय करीत. प्राप्तीवरील कर, व जकात, आणि दस्तुरी, इत्यादि सर्व बाबी घेण्यांत येत असून, एकंदर राज्याच्या उत्पन्नांतून मुलकी व लष्करी कामगारांचा मुशाहिरा दे-

ण्यांत येत असे. कित्येक ठिकाणीं कामगारांस वतनें देण्यांत येत; कित्येक प्रसंगीं त्यांस रोकड हक्क मिळे; व कधीं कधीं त्यांजला मुशाहिरा देखील ठरविण्यांत येई.

देशांतील शांतता.

याप्रमाणें, **लष्करी** आणि **मुलकी** खात्यांतील बंदोबस्त सर्वत्र असल्या कारणानें, देशांत चोहोंकडे शांतता व अबादानी असे. जीवित संरक्षणाची, किंवा धनसंरक्षणाची यत्किंचित देखील कोणासही फिकीर नसे. त्या कारणानें, जो तो आपला धंदा निर्विघ्नपणें चालवी. तेणेंकरून व्यापारास उत्तेजन येई. विद्यार्जनामुळें ज्ञानाचें पाऊल पुढेंच असे. व त्यायोगें शास्त्रान्वेषणास, व कलानिरूपणास, चांगलेंच प्रोत्साहन मिळे. एकंदरीनें सारासार विचार करतां, तत्कालीन राज्यव्यवस्थेंत ह्या देशाची स्थिति भरभराटीचीच होती, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

---

# भाग ३२ वा.

## आर्यांची शासनपद्धति.

प्रजेचें पालन, व तिचें शासन, ह्या दोन्ही गोष्टींचें नियंतृत्व प्राचीन कालापासून राजाकडेसच आहे. तथापि, राजधानीच्या ठिकाणीं, किंवा अन्यत्र, न्याय देण्याच्या संबंधानें राजाकडे फक्त **सदर अदालतीचें** मात्र काम असतें; आणि त्याशिवाय बाकीचें सर्व काम तन्नियुक्त प्रतिनिधीच करितात.

राजा, व तन्नियुक्त प्रतिनिधि, यांचें न्याय करण्याचें काम.

प्राचीन काळच्या व सांप्रतच्या स्थितींत वहिवाटीच्या संबंधानें कित्येक महत्वाच्या गोष्टींत, किंवा साधारण बाबतींत, बरेंच न्यूनाधिकत्व दिसून येतें. राजानें आपल्या प्रजाजनाचा न्याय, विद्वान, विचारी, व सरळ, अशा

प्राचीन काळच्या व सांप्रतच्या स्थितींत बदल.

---

१ यदा स्वयं न कुर्यात्तु नृपतिः कार्यदर्शनम् ।
तदा नियुंज्याद्विद्वांसं ब्राह्मणं कार्यदर्शने ॥ ९ ॥

( म. स्मृ. अ. ८. )

**ब्राह्मणांच्या** सल्यानें, आणि दूरदर्शी **मंत्रिमंडळाच्या** साहाय्यानें करावा, अशी पूर्वीच्या काळची **मन्वाज्ञा** आहे.

पंचाचें सहाय्य.

न्यायाच्या कामीं **सभ्य** लोकांची म्हणजे **आसेसेर** किंवा **जूरर** यांची मदत घेण्याची पद्धत फार प्राचीन काळापासून प्रचारांत होती असें दिसतें. तथापि, कालांतरानें ही अतिप्रशस्त चाल अगदीं मागें पडल्याचें सांप्रतच्या स्थितीवरून, व हल्लींच्या **भारतीय** राजदरबारांत चालत आलेल्या संप्रदयावरून, चांगलें व्यक्त होतें. मात्र **इंग्रजी** सत्ता ज्या ठिकाणीं आहे अशा मुलुखांत, हा प्रचार सर्वत्र सुरू आहे.

न्यायासनावर बसल्यानंतर, राजानें फार शांतता व

---

१ व्यवहारान् दिदृक्षुस्तुब्राह्मणैः सह पार्थिवः ।
मंत्रज्ञैर्मंत्रिभिश्चैव विनीतः प्रविशेत्सभाम् ।। १ ।।

( म. स्मृ. अ. ८. )

२ सोऽस्य कार्याणि संपश्येत् सभ्यैरेव त्रिभिर्वृतः ।
सभामेव प्रविश्याग्र्यामासीनः स्थित एववा ॥ १० ॥

( म. स्मृ. अ. ८ )

"Justice is to be administered by the King in person, assisted by Brahmins and other counsellors; or that function may be deputed to one Brahmin aided by three *assessors* of the same class."

( Elphinstone's. India P. 49 ).

न्यायाधीशाच्या मनाची समता.

मनाची समता[1] राखली पाहिजे. तसेंच वादी प्रतिवादी, किंवा फिर्यादी आणि आरोपी, अथवा बालक, वृद्ध, व दुःखातुर, यांचें अमर्याद असें भाषणही प्रसंगानुसार मोठ्या निग्रहानें सहन केलें पाहिजे. व न्याय देणें तो जातिनियम[2], कुलसंप्रदाय, वणिगादि धर्म, आणि रूढिमार्ग, इत्यादि सर्व गोष्टी मनांत आणून दिला पाहिजे. परंतु, ज्या एकाद्या गोष्टीचा धर्मदृष्ट्या निकाल झाला आहे, किंवा ज्या विषयासंबंधीं अमुक एक म्हणून शास्त्रव्यवस्था[3] ठरली आहे, त्यांत कोणत्याही प्रकारें नवीन कुरापत काढून, राजानें ढवळाढवळ करतां कामा नये. एकंदरींत धर्मन्याय होण्याण्यासाठीं, त्यानें हरएक तऱ्हेनें झटावें हें भूषण होय. आणि

---

१ क्षंतव्यं प्रभुणा नित्यं क्षिपतां कार्थिणां नृणाम् ।
बालवृद्धातुराणां च कुर्वता हितमात्मनः ।। ३१२ ।।

२ जातिजानपदान्धर्मान् श्रेणीधर्मांश्च धर्मवित् ।
समीक्ष्य कुलधर्मांश्च स्वधर्मंप्रतिपादयेत् ।। ४१ ।।
( म. स्मृ. अ. ८. )

३ म. स्मृ. अ. ९ श्लो. २३३.

४ नोत्पादयेत्स्वयं कार्यं राजा नाप्यस्य पूरुषः ।
नच प्रापितमन्येन ग्रसेदर्थं कथंचन ।। ४३ ।।
( म. स्मृ. अ. ८ )

सद्भिराचरितं यत्स्याद्धार्मिकैश्च द्विजातिभिः ।
तद्देशकुलजातीनामविरुद्धं प्रकल्पयेत् ।। ४६ ।। किंचा ।।

आपल्या प्रजेपासून करभार घेऊन देखील जर राजा तिचें संरक्षण करणार नाहीं, अथवा तिला न्याय देण्याचें वर्जील तर, तो इहजन्मनि अनादराप्रत प्राप्त होऊन, जन्मांतरीं ही अतीव कष्ट भोगील.

मनुस्मृतींतील नानाविध विषय.

**मनुस्मृतींत** नानाविध धर्म, कर्माचरण, व आचार-विधि, यांचेंच केवळ विवेचन आहे असें नाहीं; तर तींत **फौजदारी** कायदा, **दिवाणी** कायदा, **पुराव्या**चा कायदा, **करारा**चा कायदा, **मुदती**चा कायदा, इत्यादिकांचीं देखील मूलतत्त्वें थोड्या बहुत प्रमाणानें सांगितलीं असल्याचें दिसून येतें.

## फौजदारी कायदा.

१ राजद्रोह[१]; २ राजशत्रुसेवा[२]; ३ राजकोशहरण[३]; ४ राजपशुहरण[४]; ५ मनुष्यवध[५]; ६ स्त्रीपुरुषहरण[६]; ७ प्रहार[७] ( अपखुशीनें दुखापत करणें );८ त्वग्भेद[८] ( मोठी दुखापत ); ९ अंगविक्षेप[९] ( अंगावर धाऊन जाणें ); १०

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | म. स्मृ. | अ. | ८ | श्लो. | ३०७ | ६ | म. स्मृ. | अ. | ८ | श्लो. | ३२३ |
| २ | कित्ता. | ,, | ९ | ,, | २३२ | ७ | ,, | ,, | ८ | ,, | २८० |
| ३ | ,, | ,, | ,, | ,, | २७५ | ८ | ,, | ,, | ,, | ,, | २८४ |
| ४ | ,, | ,, | ८ | ,, | ३९९ | ९ | ,, | ,, | ,, | ,, | २७९ |
| ५ | ,, | ,, | ९ | ,, | २३५ | | | | | | |

जारकर्म[1]; ११ मातापितो[2] व स्त्रीत्याग; १२ अपहरणें; १३ चौर्य[3] ( खिसेकांपणें वगैरे ); १४ लूट अथवा दरवडा[4]; १५ चोरीचा माल घेणें; १६ वंचन[5] ( ठकबाजी ); १७ अपक्रिया; १८ तडाग[6]भेद ( बांधबंधारे फोडणें ); १९ कोष्ठागार विध्वंस ( कोठार फोडणें ); २० आयुधागारविनाश; २१ देवतागार[7]भेद ( देवालय फोडणें ); २२ उदक[8]मार्गभंग ( पाण्याला जाण्यायेण्याचे मार्ग नाहींसे करणें ); २३ प्राकार भेद; २४ परिखापूरण ( खंदक बुजाविणें ); २५ द्वार[10]भंग; २६ आग[11] लावणें; २७ आगळीक; २८ कूट लेख ( बनावट[12] दस्तऐवज करणें ); २९ कौट साक्ष्य ( खोटी साक्ष[13] देणें वगैरे ); ३० अपप्रदान[14] ( लांच वगैरे देणें ); ३१ गुन्हेगारास[15] आश्रय

---

१ म. स्मृ. अ. ८ श्लो. ३७४
,, ,, ,, ,, ३८५
,, ,, ९ ,, २३५
२ ,, ,, ८ ,, ३८९
३ ,, ,, ९ ,, २७४
४ ,, ,, ,, ,, २३५
,, ,, ,, ,, २७७
,, ,, ,, ,, २७८
,, ,, ,, ,, २८६
,, ,, ,, ,, २८७
,, ,, ,, ,, २७९

८ म. स्मृ. अ. ९ श्लो. २८०
९ ,, ,, ,, ,, २८१
१० ,, ,, ,, ,, २८९
११ ,, ,, ,, ,, २७८
१२ ,, ,, ,, ,, २३२
१३ ,, ,, ८ ,, ११९
,, ,, ,, ,, १२२
१४ ,, ,, ९ ,, २३१
,, ,, ७ ,, १२४
१५ ,, ,, ९ ,, २७२

देणें; ३२ अपसांत भांडण लावणें; ३३ जुगार खेळणें, ३४ जुगारीचा अड्डा ठेवणें; ३५ राजमार्गांत शौचास[2] बसणें; ३६ अविचारानें वाहन हांकणें; ३७ पश्वादिकांशीं क्रूर वर्तन करणें; ३८ वाईट जिन्नसे विकणें; ३९ दुश्चिकित्सा, अथवा वैद्यांचा गाफ़िलपणा; ४० सुरापान; ४१ अश्लील गालिप्रदान; ४२ अब्रू घेणें; ४३ अपमान करणें; ४४ निष्ठीवन[11] ( अपमान करण्याच्या हेतूनें अंग विक्षेप करून थुंकणें ); ४५ मूर्तिच्छेद[12] व देवालय भंग करणें; ४६ राजपुरुष[13] म्हणजे सरकारी नौकर यांनीं केलेलें दुर्वर्तन; इत्यादि मुख्य अपराध व तत्संबंधी शिक्षा मनुस्मृतींत सांगितल्या आहेत. त्यावरून तत्कालीन लोकस्थितीच्या स्वरूपाचें व सुधारणेचें चांगलें दिग्दर्शन होतें.

फौजदारी अपराधांचें वर्गिकरण.

आतां, स्थूलमानानें सदरहू अपराधांचे एकंदर दहा वर्ग करिता येतील:—१ राजाविरुद्ध अथवा सरकाराविरुद्ध अपराध. २ मनुष्याविरुद्ध किंवा तत्शरीरसंबंधी अपराध. ३

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | म. स्मृ. | अ. ९ | श्लो. | २२४ | ८ | म. स्मृ. | अ. ८ | श्लो. | २६७ |
| २ | ,, | ,, ,, | ,, | ८२२ | ९ | ,, | ,, ८ | ,, | २७३ |
| | ,, | ,, ,, | ,, | २८३ | १० | ,, | ,, ,, | ,, | २६६ |
| ३ | ,, | ,, ८ | ,, | २९० | | ,, | ,, ,, | ,, | २७२ |
| ४ | ,, | ,, ,, | ,, | २९७ | ११ | ,, | ,, ,, | ,, | २८२ |
| ५ | ,, | ,, ९ | ,, | २८६ | १२ | ,, | ,, ९ | ,, | २८५ |
| ६ | ,, | ,, ,, | ,, | २८४ | | ,, | ,, ,, | ,, | २८० |
| ७ | ,, | ,, ,, | ,, | २३५ | १३ | ,, | ,, ,, | ,, | २७२ |

स्थावर जंगमात्मक द्रव्य अथवा मालाविरुद्ध अपराध. ४ बनावट दस्तऐवज अथवा कूटलेख, साक्ष्य, व न्यायाविरुद्ध अपराध.५ लोकांच्या स्वस्थतेविरुद्ध अपराध. ६ लोकांचे आरोग्य, सुरक्षितपणा, सोय, सदाचरण, आणि लज्जा, यां विरुद्ध अपराध. ७ अब्रू घेणें. ८ अपमान करणें. ९ धर्मा-विरुद्ध अपराध. आणि १० राजपुरुष अथवा सरकारी नोकर यांनीं केलेले अपराध.

त्यांतील गुणदोष.

सदर्हुपैकीं, कांहीं अपराधांस निरनिराळ्या शिक्षा सांगितल्या असून कांहींस तर, गुरु-लघुत्वाचें परिमाण यत्किंचितूही म-नांत न आणितां, एकाच मालिकेंत गोंविल्याचें उघड दि-सतें. अपराधाच्या स्वरूपाप्रमाणें शिक्षेचें मान ठरविल्याचें कोठेंही दिसत नाहीं. या कारणानें ही प्राचीन शासनप-द्धति फारच विसंगत भासते. शिवाय, अपराधास सांगि-तलेल्या कांहीं कांहीं शिक्षा देखील अतिक्रूर[२] व रानटी[३] अवस्थेंतील असल्याचें व्यक्त होतें. त्यामुळें आर्यांची कु-शाग्रबुद्धि व त्यांचें नैसर्गिक औदार्य, ह्यांचा एतद्वि-षयक सारासार विचार करण्यांत कसा लोप झाला,

---

१ ब्रह्महा च सुरापश्चस्तेयी च गुरुतल्पगः ।
एते सर्वे पृथग्ज्ञेया महापातकिनो नराः ॥ २३५
(म. स्मृ. अ. ९.)

२ म. स्मृ. अ. ८ श्लो ३७२, ३७७.

३ म. स्मृ. अ. ९ श्लो. २७७.

2H3330

याविषयीं महदाश्चर्य वाटतें. आतां, कदाचित् कोणी अशी कल्पना करील, किंवा आक्षेप आणील कीं, आर्यांचा **फौजदारी** कायदाचसा काय, पण तत्कालीन इतर कायदे म्हणजे, **दिवाणी**[1] व **पुरा**[2]व्याचा कायदा, हे देखील रानटी अवस्थेतील आणि अनुदारच आहेत. परंतु हें म्हणणें अगदींच निराधार होईल. कारण, मागील लेखावरून, आणि पुढील विवेचनावरून असें खचित सिद्धवत् भासेल कीं, फौजदारी कायद्याशिवाय इतर सर्व बाबतींत हिंदूंचें पाऊल सुधारणेच्या सर्व शाखांत फारच पुढें सरसावलेलें होतें, यांत संशय नाहीं.

फौजदारी कायद्यांतील शिक्षेचे प्रकार.

असो. फौजदारी कायद्यांत एकंदर शिक्षेचे प्रकार खालीं लिहिल्याप्रमाणें दिसून येतातः-

१ देहदंड[3]. ( म्हणजे फांशीं देणें, अथवा अन्य उपायांनीं ठार मारणें ).

---

1 "The laws for civil judicature are very superior to the Penal Code, and, indeed, are much more rational and matured than could well be expected of so early an age."

2. "The law of evidence in many particulars resembles that of England.

(Elphinstone's H. of India.)
P. P. 58-59.

३ म. स्मृ. अ. ९ श्लो. २३२.

२ सजीव दहनं[1]. ( तप्तलोहानें अथवा काष्ठांनीं जिवंत जाळणें. )

३ शूलारोपणं[2]. ( सुळावर चढवून प्राण घेणें. )

४ श्वभक्षणं[3]. ( कुत्र्यांकडून खावविणें ).

५ जलमज्जनं[4]. ( पाण्यांत बुडवून जलसमाधि देणें. )

६ अवयवच्छेदं[5]. ( करंगळी किंवा बोटें वगैरे कांपणें. )

७ अंकनं[6]. ( तप्तलोहानें शरीराच्या भागावर डाग देणें. )

८ प्रवासनं[7] ( काळ्यापाण्याची शिक्षा देणें, किंवा हद्दपार करणें).

९ बहिष्कारं[8]. ( वाळींत टाकणें ).

१० साहसं[9]. ( दंड ).

सदरहू शिक्षांपैकीं शेज ७ । ६ । ५ । ४ । ३ । व २ च्या शिक्षा, एकापेक्षां एक क्रूरतरच आहेत, यांत संशय नाहीं.

कमींत कमी, दंड दोनशेंपन्नास पणं[11] सांगितला असून,

| | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | म. | स्मृ. | अ. ८ | श्लो. | ३७२ | ६ | म. | स्मृ. | अ. | ९ | श्लो. | २३७ |
| | ,, | ,, | ,, | ,, | ३७७ | ७ | ,, | ,, | ,, | ,, | | २४२ |
| २ | ,, | ,, | ९ | ,, | २७६ | | ,, | ,, | ,, | ,, | | २८९ |
| ३ | ,, | ,, | ८ | ,, | ३७१ | | ,, | ,, | ८ | ,, | | ३५२ |
| ४ | ,, | ,, | ९ | ,, | २७९ | ८ | ,, | ,, | ९ | ,, | | २३९ |
| ५ | ,, | ,, | ,, | ,, | २७७ | ९ | ,, | ,, | ,, | ,, | | २४० |

११ अशीतिभिर्वराटकैः पण इत्यभिधीयते ।

म्हणजे ऐंशी कवडयाबरोबर एक पण असून, त्याची किंमत सव्वा पैसा ( ह्मणजे सव्वा शिवराई ) होते.

दंडाची मर्यादा.

त्याची मर्यादा एक हजार पणापर्यंत आहे. ह्यापेक्षां तो जास्त असतां कामा नये. मध्यम दंड म्हटला म्हणजे पांचशे पण होय.

तुलादि परीक्षण.

हरएक जिन्नस जोखून देण्यासाठीं, ज्या तुला म्हणजे कांटे किंवा तराजू ठेविले असतील, अथवा मापें आणि वजनें राखलेलीं असतील, तीं सर्व चोख असून तत्संबंधीं लबाडी होऊं नये, व प्रजावर्ग फसला जाऊं नये म्हणून, त्यांची वारंवार व दर सहामाहीस[२] सरकारांतून तपासणी होण्याविषयीं, मनुस्मृतींत स्पष्ट उल्लेख आहे. त्याचप्रमाणें, इतर किरकोळ बाबतींतही थोडक्यांत व चांगले नियम सांगितलें आहेत; त्यावरून होतां होईं तों गुन्हे न व्हावे एतदर्थ, विशेष खबरदारी आणि योग्य बंदोबस्ताची तजवीज झालेली असल्याचें उघड दिसतें.

## साधारण अपवाद.

साधारण अपवाद.

१ कांहीं गोष्टींत धर्मबुद्धीनें अनृत बोलल्यास दंड अगर पातक† नाहीं.

१ पणानां द्वे शते सार्धे प्रथमः साहसः स्मृतः ।
मध्यमः पंच विज्ञेयः सहस्रं त्वेव चोत्तमः ॥ १३८ ॥

२ तुलामानप्रतीमानं सर्वं च स्यात्सलक्षितम् ।
षट्सु षट्सु च मासेषु पुनरेव परीक्षयेत् ॥ ४०३ ॥
(म. स्मृ. अ. ८.)

† ही टीप पुढील पानावर पहा.

२ सत्य बोलल्या कारणानें ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र, यांच्या जिवाचा घातच होण्याचा जर संभव आहे तर, असत्य बोललें असतां चालेल. किंबहुना, अशा प्रसंगीं खऱ्या भाषणापेक्षां खोटें भाषणच विशेष श्रेयस्कर असल्याविषयीं मनुस्मृतींत[1] सांगितलें आहे.

३ बैलांची वेसण तुटल्या कारणानें,

४ जोकड मोडल्यामुळें,

५ गाडी खांच खळग्यांच्या संबंधानें उलटी फिरल्यानें,

६ आंस मोडल्यानें,

७ गाडी मोडल्या कारणानें,

८ चांक मोडल्यामुळें,

९ बंद सुटल्यानें,

१० जुपण्या तुटल्यानें,

११ आरोळी मारल्यानें, अथवा

१२ "चलो बाजू," "चाल ए," "बाजू हाक,"

---

† तद्वदन्धर्मतोर्थेषु जानन्नप्यन्यथा नरः ।
न स्वर्गाच्च्यवते लोकाद्दैवींवाचं वदन्ति ताम् ॥ १०३ ॥

१ शूद्रविट्क्षत्र विप्राणां यत्रर्तोक्तौ भवेद्वधः ॥
तत्रवक्तव्यमनृतंताद्धि सत्याद्विशिष्यते ॥ १०४ ॥
कामिनीषु विवाहेषु गवां भक्ष्ये तथेन्धने ।
ब्राम्हणाभ्युपपत्तौ च शपथे नास्ति पातकम् ॥ ११२ ॥
(म. स्मृ. अ. ८)

वगैरे शब्द बोलल्यामुळें, जर क्वचित् प्रसंगीं प्राणहानि घडली, किंवा द्रव्यनाश झाला, तर त्याबद्दल सारथीला अथवा वहन हांकणारास दंड[1] नाहीं.

१३ वादी प्रतिवादी,

१४ बालक,

१५ वृद्ध, अथवा

१६ व्याधिग्रस्त, यांनीं आपापल्या कार्यार्थ कमी जास्ती उद्दाम भाषण केलें, किंवा ते टाकून बोलले, तरी त्याबद्दल राजानें त्यांस क्षमा[2] करावी.

१७ धर्मावरचें[3] गदा आल्यामुळें, जर कदाचित् धर्मच्युतिच होण्याचा संभव असेल, अथवा

१८ परचक्र आल्या कारणानें मोठें संकट ओढवलें असेल, किंवा

१९ युद्ध करण्याचा प्रसंगच उद्भवल्यामुळें, आपलें, स्त्रीजनाचें, आणि गोधनादींचें[4], रक्षण करण्याची पराकाष्ठेची अवश्यकता असेल तर, ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य, यांनीं तें हरएक प्रकारें करावें.

---

१ यानस्यचैव यातुश्च यानस्वामिन एव च ।
दशाति वर्तनान्याहुः शेषे दंडो विधीयते ॥ २९० ॥
(म. स्मृ. अ. ८. २९१ । २९२)

२ म. स्मृ. अ. ८. श्लो. ३१२.

३ ,, ,, ,, ,, ३४८.

४ ,, ,, ,, ,, ३४९.

अशा प्रसंगीं, स्वसंरक्षणार्थ दुसऱ्याच्या जीवाची हानि झाली तरी, दोष किंवा दंड नाहीं.

२० व्याधित, किंवा

२१ वृद्ध, अथवा

२२ गर्भिणी, किंवा

२३ लहान मूल,

यानीं राजमार्गावर शौचास बसून घाण केली तर, त्या कृत्याबद्दल त्यास दंड न करितां, पुनश्च अशी घाण करूं नये, म्हणून त्यांस फक्त ताकीद मात्र द्यावी. आणि रस्त्यांत पडलेली हेंदर काढून टाकावी.[1]

असत्य भाषण करण्याविषयीं धर्मशास्त्राचा निषेध.

पहिल्या व दुसऱ्या अपवादांत, अनृत बोलण्याविषयीं जरी शास्त्रप्रमाण आहे तरी, त्याचा उपयोग केवळ अडचणीच्या प्रसंगीं, अथवा पराकाष्ठेच्या संकटसमयीं, मात्र करण्याचा आहे. त्याचा मनःपूत असा दुरुपयोग बिलकुल करण्याचा नाहीं. कारण, असत्य भाषण करणें म्हणजे आमच्या धर्माप्रमाणें महत् पातक होय. सत्याचें तेज आणि महत्वी, तसेंच असत्यापासून उद्भवणारे दुष्परिणाम व महत् पातक, याविषयींचें वर्णन व दाखले,

---

१ आपद्गतोऽथवा वृद्धो गर्भिणी बाल एव वा ।
परिभाषणमर्हंति तच्च शोध्यमिति स्थितिः ॥ २८३ ॥
( म. स्मृ. अ. ९. )

आर्य ग्रंथसंपत्तींत सर्वत्र दिसून येतात. वेद[1] अथवा ब्राम्हणें[2], अरण्यकें[3] अथवा उपनिषदें[4], रामायण[5] अथवा महाभारत[6], धर्मशास्त्र[7] अथवा नीतिशास्त्र, पुराणें अथवा कथानकें, वगैरे कोणत्याही ग्रंथावर तुम्ही दृष्टी फेंकली, तरी त्यांत " सत्यंवद, धर्मंचर, " या अनुपमेय नीतितत्वाचें अक्षरशः अवलंबन केल्याचें तुमच्या नजरेस वारंवार पडेल. आणि अनृत भाषण न करण्याविषयीं इतक्या सक्तीचें नियमन, व तत्संबंधीं अशा प्रकारचें पापभीरुत्व, ह्या जगत्तलावर अन्यत्र कोठेंही क्वचितच आढळेल, यांत संशय नाहीं.

---

१ ऋग्वेद १.८७, ४
१४५, ५
१७४, १
५.२३, २
३.१४, ६
अथर्ववेद ४.१६

२ शतपथ ब्राह्मण २, २, १९
,, ३.१, २, १०

३ तैत्तिरीय अरण्यक १०.९.

४ कथोपनिषद्.

५ रामायण महाकाव्य. (जाबालीप्रतरामोक्ति).

६ महाभारत ८.३४४८. सत्यवादी याची गोष्ट.
महाभारत १.३०१५।१६

७ म. स्मृ. अ. ४ श्लो. १७५
,, ,, ,, ,, २५५
,, ,, ७ ,, २६

8. "The whole of their literature (*i. e.* of the Hindus) from one end to the other is pervaded by expressions of *love and reverence for truth.*"

(What can India teach us? P. 64.)

9. "I doubt whether in any other of the

(पुढें चालू)

**सत्यधर्मार्यवृत्तेषु शौचे चैवारमेत्सदा ।**
**शिष्यांश्च शिष्याद्धर्मेण वाग्बाहूदरसंयतः ॥१७५॥**

( म. स्मृ. अ. ४ )

सत्याविषयीं हिंदूंची नैसर्गिक प्रीति.

सत्याविषयीं हिंदूंची किती उदार प्रीति, आणि कसें अत्युत्कट प्रेम आहे, हें खालीं लिहिलेल्या गोष्टीवरून चांगलें व्यक्त होईल.

फार प्राचीन काळीं, **कौशिक** नांवाचा कोणी एक **ब्राम्हण** होता. तो कधींही असत्य भाषणच करीत नसे; व त्या कारणानेंच त्याला **सत्यवादी** असें ह्मणत असत. एके दिवशीं, कांहीं माणसें, आपल्या जिवाचें संरक्षण भामटे आणि दरवडेखोर ह्यांच्या तडाक्यांतून व्हावें एतदर्थ, जीव घेऊन अरण्यांत पळत जात असतांना, त्यानें पाहिलीं. त्यांचा पाटलाग करीत करीत, कांहीं चोरटे त्याच वाटेनें जात होते. त्यानीं **कौशिक** ब्राह्मणास पाहून विचारिलें कीं, पळपुटे कोणत्या मार्गानें गेले. त्या वेळीं, त्यानें आपल्या व्रतास अनुसरून, पाहिलेला खरा वृत्तांत

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

ancient literatures of the world you will find traces of that extreme sensitiveness of conscience which de-rs of our ever speaking the truth, and which declares silence gold and speech silver, though in a much higher sense than our proverb."

( What can India teach us? P. 73. )

सांगितला. परंतु त्याचा परिणाम इतका भयंकर झाला कीं, रानांत पळालेले सर्व लोक त्या निर्दय चोरट्यांच्या हातीं सांपडून प्राणासही मुकले; व त्या बिचाऱ्या गरीब **सत्यवादी ब्राह्मणास**, सदर्हू घडलेल्या जीवहत्त्येमुळें, नरकवास मात्र भोगावा लागला.

पहा, आपणावर ओढवलेला दुर्धर प्रसंग व महत् संकट, यांविषयीं तिळमात्रही खंती न धरितां, त्या **सत्यवादी** ब्राह्मणानें अशा प्रकारें सत्याचें अवलंबन केलें, ही केवढी आश्चर्याची आणि विस्मय वाटण्यासारखी गोष्ट आहे ! सत्याकारणें एकनिष्ट राहण्यासाठीं, ज्यानें केवळ नरकवासही भोगला, तो नरपुंगव खचित् सामान्य नसून, अलौकिक समजला पाहिजे.

सत्याच्या अबाधित नियमांत, अपवादानें मर्यादा ठरविण्याचें कारण,

आतां, अशा प्रकारचे अति घोर प्रसंग होतां होईं तों टाळतां यावे, आणि अन्यायानें कोणाचाही घात होऊं नये, एतदर्थच कांहीं विशेष बाबतींत अपवाद ठरवून, त्यांचें नियमन करणें आमच्या स्मृतिकारांस अगदीं अगत्याचें वाटलें. आणि विशेष प्रसंगीं अशा प्रकारचे अपवाद अगदीं अवश्य असावेत, हेंही फार लाजम दिसतें.

---

१ महाभारत. ८. ३४४८

**सत्य** ही अमोलिक वस्तु, जरी सर्व काळीं आणि सर्व स्थळीं, अबाधित आहे, आणि त्या कारणानेंच संग्रहासही अतियोग्य आहे तरी, मानुषिक प्रमाद व नश्वरत्व, हीं मनांत आणून, तत्संबंधीं, क्वचित् प्रसंगीं, कांहीं मर्यादा करणें अगदींच जरूर आहे.

अपरिहार्य उणीव.

मोठमोठाल्या सुधारलेल्या राष्ट्रांत देखील, तत्संबंधीं उणीव चांगल्या प्रकारें दिसून येते; आणि ही उणीव अपरिहार्य असल्यामुळें, तिचें समर्थनही तद्देशीय लोक करितात. कारण तसें केल्याशिवाय त्यांसचसें काय, पण कोणासही, गत्यंतरच नाहीं. **इंग्लंड** हें आजकाल अतिसुधारलेल्या राष्ट्रांत मोडतें, व तेथील लोक आपणांस ( तद्देशस्थांस ) फार प्रामाणीक समजतात; निदान ते तरी आपल्या भोंवतीं दिवा, आपणच होऊन, ओंवाळून घेतात. तेव्हां, अशा **आंग्लराष्ट्रांत**, असत्य हें स्वप्नीं देखील नसावें; अथवा निदान तें उच्च वर्गांत, किंवा शिकलेल्या लोकांत तरी दृष्टी पडूं नये; निदान त्याचें समर्थन तरी विद्वानांनीं करूं नये; हें इष्ट होय. परंतु तसें बिलकुल झालेलें दिसत नाहीं. कारण, प्रसंगानुसार त्यांस देखील **असत्यतेचें** अवलंबन करणें भाग पडतें. नाहींपेक्षां सुटकाच नाहीं. अशा अडचणींत लहान अथवा थोर, गरीब अथवा श्रीमंत, कुलीन अथवा कुलहीन, अडाणी अथवा

शाहाणा, अक्षरशून्य अथवा विद्वान, असा प्रत्येकजण, सत्याला अपवादानें कांहींना कांहीं तरी, नियमित मर्यादा ठरवून, एकंदर समाजस्थिति नेहमींच सुरळीत चालेल, व अबाधित राहील, असें करूं इच्छितो.

तत्संबंधी बेन्थॉमचें मत.

इंग्लंडांतील प्रसिद्ध ग्रंथकार बेन्थाम्[1] ह्याच्या मताप्रमाणें, खालीं लिहिलेल्या बाबतींत यत्किंचित् देखील पातक अथवा कोणत्याही प्रकारचा अपराध नाहीं:-

१ घडून येणारा अनर्थ, किंवा विघ्न, अथवा अपकार, इत्यादि टाळण्यासाठीं केलेलें अनृत भाषण;

२ रोग्याच्या हितार्थ वैद्यानें केलेलें मिथ्या भाषण;

३ नागरिक व्यवहारांतील मिथ्या प्रशंसा.

उदाहरणार्थ, १ कोणी मनुष्य दुसऱ्याचा खून, किंवा त्याचें नुकसान, करण्यासाठीं जात असेल तर, त्यास खोटें सांगून अथवा त्याच्याशीं भलतीच थाप मारून, ओढवणारें अरिष्ट व नुकसान टाळणें उचित होय. तसेंच, २ रोगाची खरी भावना सांगितल्या कारणानें जर रोग्याच्या मनाला धक्का पोहोंचून, त्यापासून भयंकर परिणाम अथवा घात होण्याचा संभव आहे, तर वैद्यानें असत्य भाषण करून, घडून येणारा दुष्परिणाम टाळावा हें बरें.

1. Jeremy Bentham wrote on Law, Political economy, and commerce. Died June 6th 1832.

२ त्याप्रमाणेंच, व्यवहारांतील अनेक गोष्टींच्या संबंधानें समजावयाचें. दोन स्नेह्यांची भेट झाली ह्मणजे, ते परस्परांविषयीं कुशलवृत्त पुसतात; आणि समाचार घेण्याच्या हेतूनें प्रकृति व घरचीं माणसें खुशाल आहेतना, ह्मणून प्रत्येकाकडून विचारण्यांत येतें. तेव्हां, त्यांची प्रकृति किंवा गृहस्थिति, वगैरे संबंधानें बरीच अस्वस्थता असतांही, ते "ठीक आहे" असें प्रत्युत्तर देतात. तसेंच सहजगत्या बोलण्याच्या ओघांत, कोणाची कमिजास्ती स्तुति देखील करण्यांत येते. तेव्हां, अशा सर्व प्रसंगीं किंचित् असत्य भाषण, अथवा क्वचित् मिथ्यास्तुति, हीं बिलकूल दोषार्ह नाहींत, असें कांहीं विद्वज्जनांचें मत आहे, व तें अगदीं यथार्थ आहे.

सदरीं लिहिल्यापैकीं, पहिल्या दोन अपवादांच्या संबंधानें तर बेन्थामूचें असें ह्मणणें आहे कीं असल्या प्रसंगीं असत्य भाषण करणें हें केवळ कर्तव्यकर्मच होय. तसेंच, इतर प्रसंगीं तें कारणपरत्वें केल्यास कांहीं हरकत नाहीं.

"Bentham allows :—

I. Falsehoods to avoid mischief, the case of misdirecting a murderer;

II. Falsehoods of humanity, the case of physicians;

III. Falsehoods of urbanity, an exaggerated compliment,

In these cases, or at least in the first two, he says, "falsehood is a duty; in other cases it may be allowable, as in all those in which the person addressed has no right to know the truth. This would embrace most of the cases discussed by Grotius and Puffendorf ‡."

आपल्या नेहेमींच्या आयुष्यक्रमांत, बहुत करून असें निदर्शनास येतें कीं, सत्यापेक्षां उपयुक्ततेविषयीं लोकसमाजाची प्रेरणा अधिक असते. आणि ती तशी असणें, हें देखील अगदीं साहजिक आहे. इंग्लंडांतील सुप्रसिद्ध वक्ता बर्क, व त्याच देशांतील नामांकित इतिहासकार बकल्, ह्यांचें या बाबतींत असें मत आहे कीं, सत्य

‡ Vide also an article on "Lying" in the Saturday Review of July 2nd, 1864.

1. "Politics ought to be adjusted, not to human reasonings, but to human nature; of which the reason is but a part, and by no means the greatest part."

(Observations on a late state of the nation,

in Burke's Works, Vol. I. P. 113.)

2. "Hence it was, that he recognized in all its bearings that *great doctrine*, which even in our own days is too often forgotten, that the aim of the legislator should be, *not truth, but expediency.* * * and that, therefore, it is the part of the wise man,

( पुढें चालू )

आणि उपपत्ति ह्यापेक्षां, उपयुक्तता व प्रयोग, हीं साधण्याकडेसच शास्ते आणि व्यवस्थाकार यांचा मुख्य हेतु असला पाहिजे.

अनृत भाषणास अतिदारुण शिक्षा.

अशा प्रकारें सर्व अडचणी मनांत आणून, पोक्त व योग्य विचार केला तर, हिंदुधर्मशास्त्रांतील सदरच्या अपवादांत यत्किंचितही दोष आहे, असें न्यायानें खचित कोणास देखील वाटणार नाहीं. इतकेंच नाहीं तर, असत्य भाषण करण्याविषयीं आमच्या धर्मशास्त्राची खास अनुज्ञाच आहे, अशी जी कांहीं पाश्चात्यांनीं वृथा ओरड घातली आहे, ती मात्र अल्प समजुतीची व खोटी ठरूं पाहते. कारण आमच्या धर्म-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

when he adds to the facts, to revise the induction, and instead of sacrificing practice to principles, modify the principles that he may change the practice."

( Buckle's History of civilization in England. P. 458. )

1. From these passages it has been assumed that the Hindù law gives a direct *sanction* to perjury ;"

2. "Two exceptions, which disgrace these otherwise well-intentioned rules, have attracted more attention in Europe than the rules themselves."

(Elphinstone's India P.P. 59-60).

शास्त्रांत अनृत बोलण्याविषयीं एकंदर सक्त मनाई असून, असत्य भाषण करणारास अति दारुण[१] शिक्षाही सांगितल्या आहेत; व ती गोष्ट पाश्चात्य[२] देखील कबूल करितात.

## दिवाणी कायदा.

दिवाणी बाबींचें नियमन.

फौजदारी कायद्यापेक्षां दिवाणी[३] बाबींचें नियमन फारच सुरेख असल्यामुळें, त्यावेळच्या विशेष सुधारलेल्या स्थितीचें चांगलें दिग्दर्शन होतें. आणि त्यांतही

---

१ ब्रह्मघ्नो ये स्मृता लोका ये च स्त्रीबालघातिनः ।
मित्रद्रुहः कृतघ्नस्य ते ते स्युर्ब्रुवतो मृषा ॥ ८९ ॥
नग्नो मुंडः कपालेन भिक्षार्थी क्षुत्पिपासितः ।
अंधः शत्रुकुलं गच्छेद्यः साक्ष्यमनृतं वदेत् ॥ ९३ ॥
( म. स्मृ. अ. ८ )
अवाक्शिरास्तमस्यन्धे किल्बिषी नरकं व्रजेत् ।
यः प्रश्नं वितथं ब्रुयात्पृष्टः सन्धर्मनिश्चये ॥ ९४ ॥ कित्ता ॥

2 "Yet there is more space devoted in this code to the prohibition of false evidence than to that of any other crime, and the offence is denounced in terms as awful as have ever been applied to it in any European treatise either of religion or of law."

(Elphinstone's India P. 60.)

3 "The laws for civil judicature are very superior to the penal code, and, indeed, are much more rational and matured than could well be expected of so early an age." (Do. Do. P. P. 58-61).

कांहीं कांहीं गोष्टींचें विवेचन तर इतक्या संपूर्ण रीतीनें केलें आहे कीं, तें फारच विचाराचें, दूरदृष्टीचें, व मार्मिकपणाचें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आमच्या प्राचीन काळच्या **दिवाणी** कायद्यांत, मुख्यत्वेंकरून खालीं लिहिलेल्या बाबींचें तपशीलवार वर्णन दिसून येतें.

१ ऋणादान. ( कर्जाची देवघेव ).
२ निक्षेप. ( ठेव ).
३ अस्वामि विक्रय. ( मालकीशिवाय विक्रय ).
४ समुत्थान. ( भागीदारांचा व्यवहार ).
५ अनपकर्म. ( कर्जाची फेड न करणें ).
६ वेतनादान. ( चाकरीचा अथवा मजुरीचा मुशाहिरा न देणें ).
७ संविदातिक्रम. ( करार मोडणें ).
८ क्रयविक्रयानुशय. ( झालेली देवघेव रहित करणें).
९ स्वामिपाल विवाद. ( धनी व नोकर यांच्यामधील विवाद ).
१० सीमाविवादधर्म. ( हद्दीच्या संबंधाचा तंटा ).
११ स्त्रीपुंधर्म. ( नवरा बायकोचा परस्पर धर्म ).

1 "Some of these heads are treated of in a full and satisfactory manner." * * *

(Elphinstone's India P. P. 58-61).

१२ विभाग. ( आप्तवर्गाची आपापसांत वांटणी ).

सदरहू निव्वळ दिवाणी बाबतींत, मनुस्मृतिकारानें खालीं लिहिलेल्या फौजदारी बाबी- ही घुसडून दिल्या आहेतः— १ शिव्या देणें; २ मारामार करण; ३ चोरी करणें; ४ बळजबरीची चोरी, किंवा दरवडा घालणें; ५ दुसऱ्याची बायको हरण करणें; आणि ६ द्यूत- खेळणें.

दिवाणी व फौजदारी बाबींचें मिश्रण.

तथापि, तत्संबंधीं कांहीं उणीवा एका बाजूला ठेवि- ल्या तर, दिवाणी कायद्याचें एकंदर विवेचन तत्कालीन उन्नतावस्थेचें चांगलेंच द्योतक होय.

---

१ तेषामाद्यमृणादानं निक्षेपोऽस्वामिविक्रयः ।
संभूय च समुत्थानं दत्तस्यानपकर्मच ॥ ४ ॥
वेतनस्यैव चादानं संविदश्च व्यतिक्रमः ।
क्रयविक्रयानुशयो विवादः स्वामिपालयोः ॥ ५ ॥
सीमाविवादधर्मश्च पारुष्ये[२] दण्डवाचिके[२] ।
स्तेयं[२] च साहसं चैव स्त्रीसंग्रहणमेव[२] च ॥ ६ ॥
स्त्रीपुंधर्मो विभागश्च द्यूतमाव्हय[२] एव च ।
पदान्यष्टादशैतानि व्यवहारस्थिताविह ॥ ७ ॥
( म. स्मृ. अ. ८ ).

2 "The following statement of the principal titles of law implies an advanced stage of civilisation, and would not, in itself, be deficient in clearness and good sense, if it were not for the mixture of civil and criminal suits."

(Elphinstone's India. P. 61).

कर्ज वसुलाची रीति

देवघेवीच्या संबंधानें दिलेल्या कर्जाची फेड होण्यासाठीं, धनकोनें प्रथमतः खासगी रीतीनें व्यवस्था करावी, अशा विषयीं मनुस्मृतींत उल्लेख आहे. ह्मणजे न्यायपीठासमोर उघड रीतीनें दाद मागण्यापूर्वीं, ज्या ज्या उपायांनीं ह्मणून आपल्या उसनवार दिलेल्या द्रव्याची फेड ऋणकोकडून करवितां येईल, ते ते उपाय धनकोनें योजावे, असें स्मृतिकार ह्मणतात. हे उपाय पांच प्रकारचे सांगितले आहेत; १ धर्म, २ व्यवहार, ३ छल, ४ आचैरित, आणि ५ बलात्कार. ( १ ) प्रथमतः ऋणकोला, किंवा त्याच्या आप्तवर्गास, अथवा इष्टमित्रांस, दोन गोष्टी सांगून त्यांजकडून कर्जाची फेड करवावी. (२) ह्यानें कांहीं कार्यभाग झाला नाहीं तर, ऋणकोस आणखी थोडेसें द्रव्य देऊन, त्याजकडून व्यापार करवावा, आणि त्यांत जो फायदा होईल त्यांतून आपल्या कर्जाची फेड धनकोनें करून घ्यावी. (३) ह्या पासूनही कांहीं उपयोग झाला नाहीं तर, त्यानें कपटानें आ-

---

१ यैर्यैरुपायैरर्थं स्वं प्राप्नुयादुत्तमार्णिकः ।
तैस्तैरुपायैः संगृह्य दापयेदधमार्णिकम् ॥ ४८ ॥

२ धर्मेण व्यवहारेण छलेनाचरितेन च ।
प्रयुक्तं साधयेदर्थं पंचमेन बलेन च ॥ ४९ ॥

( म. स्मृ. अ. ८. )

३ धरणें घेऊन बसणें.

पली रक्कम उगवून घ्यावी. ( ४ ) त्यापासून देखील कांहींच फायदा झाला नाहीं तर, त्यानें धरणें[1] घेऊन बसावें. (५) आणि इतक्याही सर्व तजविजी व्यर्थ झाल्या तर मात्र, बलात्कारानें[2] उग्राणी करावी. आतां, अशा प्रकारची सत्ता धनकोकडे सोंपणें ह्मणजे अन्यायमूलक होय. आणि त्यांतही विशेषतः, अशा प्रकारें खासगी तऱ्हेनें निकाल केलेल्या भानगडींत, राजानें अगदीं पडूं नये, किंवा त्यानें त्याचा बिलकूल निषेधही करूं नये, ह्मणून धर्मशास्त्राची[3] आज्ञा असणें फारच भयंकर, जुलुमी, आणि अपकारक आहे. असल्या प्रकारच्या अनिष्टकारक सवलतीनें, धनिकवर्गास दरिद्रावस्थेंतील प्रजाजनावर जुलुम करण्यास वृथाकारण मिळतें; सबब तें तसें देणें हें फार हानिकारक असून, प्रजेच्या हितास आणि संरक्षणास अगदींच अनर्थमूलक होय.

व त्यापासून उद्भवणारे दुष्ट परिणाम.

---

१ दारपुत्रपशून्हत्वा कृत्वा द्वारोपवेशनम् ।
यत्रार्थी दाप्यतेऽर्थं स्वं तदाचरितमुच्यते ।। बृहस्पतिः ।।

२ बध्वा स्वगृहमानीय ताडनाद्यैरुपक्रमैः ।
ऋणिको दाप्यते यत्र बलात्कारः प्रकीर्तितः ।। बृहस्मृतिः ।।

३ यः स्वयं साधयेदर्थमुत्तमर्णोऽधमर्णिकात् ।
न स राज्ञाऽभियोक्तव्यः स्वकं संसाधयन्धनम् ।। ५० ।।
( म. स्मृ. अ. ८ )

असो. एकंदरींत, कांहीं गोष्टी खेरीज करून, दिवाणी दावे चालविण्याची रीत यथायोग्य, व न्यायास अनुसरूनच, असल्याचें दिसतें. सदरीं लिहिल्याप्रमाणें, देवघेवीची अपसांत तडजोड झाली नाहीं तर, वादीनें सरकाराजवळ दाद मागावी. वादीची फिर्यादअर्जी दाखल झाल्यावर, राजानें अथवा तन्नियुक्त प्रतिनिधीनें कोणता तरी एकादा नियमित दिवस ठरवून, पक्षकार आणि साक्षिदार यांजला निमंत्रण करावें. तदनंतर त्या नियमित दिवशीं वादी, प्रतिवादी, आणि साक्षिदार, असे[1] न्याय संसदीं ह्मणजे कचेरींत किंवा कोर्टांत हजर झाल्यावर, जें खरें असेल तेंच सांगण्याविषयीं त्यांजला सुचेना[2] करून, पुराव्याप्रमाणें न्यायाधीशानें न्याय द्यावा.

सरकारांत दाद मागितल्यावर, काम चालण्याची पद्धति.

न्याजाचा दर, दर महिन्यास शेकडा दोन पासून पांच टक्क्यांपर्यंत[3] असून, तारण किंवा गहाण असल्यास

---

१ सभांतः साक्षिणः प्राप्तानर्थिप्रत्यर्थिसंनिधौ ।
प्राड्विवाकोऽनुयुंजीत विधिना तेन सांत्वयन् ॥ ७९ ॥

२ यद्द्वयोरनयोर्वेत्थ कार्येऽस्मिन्चेष्टितं मिथः
तद्ब्रूत सर्वं सत्येन युष्माकं ह्यत्र साक्षिता ॥ ८० ॥

३ द्विकं त्रिकं चतुष्कं च पंचकं च शतं समम् ।
मासस्य वृद्धिं गृह्णीयाद्वर्णानामनुपूर्वशः ॥ १४२ ॥

(म. स्मृ. अ. ८)

व्याजासंबंधीं नियम.

कमी व्याज[1] द्यावें; अथवा दिलेल्या तारणापासून धनकोचा फायदाच असेल तर, व्याज घेऊं देखील नये, असें स्मृतिकारांनीं सांगितलें आहे.

कर्जी रक्कम घेऊन, धन प्राप्त्यर्थ कांहीं अन्य व्यव[2]हार केला असेल, म्हणजे खुष्कीच्या मार्गानें, अथवा जलमार्गानें कांहीं माल नेला असेल तर, तत्संबंधी देखील व्याजाचे नियम पृथक् पृथक् सांगितले आहेत.

# पुराव्याचा कायदा.

व

## तत्संबंधीं नियम.

आमच्या धर्मशास्त्रांत पुरावा अथवा प्रमाणें, तीन प्रकारचीं सांगितलीं आहेत. १ अ-प्रत्यक्ष प्रमाण; २ प्रत्यक्ष प्रमाण; आणि ३ लेख्य प्रमाण.

तीन प्रकारचीं प्रमाणें.

१ मुखचर्येवरून[3] अथवा अंगकंपादिकांवरून, बाह्य-

१ न त्वेवाधौ सोपकारे कौसीदीं वृद्धिमाप्नुयात् ।
न चाधेः कालसंरोधान्निसर्गोऽस्ति न विक्रयः ॥ १४३ ॥

२ म. स्मृ. अ. ८ श्लो. १५१ म. स्मृ. अ. ८ श्लो. १५७
,, ,, ,, १५६

३ बाह्यैर्विभावयेल्लिङ्गैर्भावमन्तर्गतं नृणाम् ।
स्वरवर्णेङ्गिताकारैश्चक्षुषा चेष्टितेन च ॥ २५ ॥
(म. स्मृ. अ. ८)

अप्रत्यक्ष प्रमाण.

कृतीवरून अथवा बोलण्याचालण्याच्या रोंखावरून, मानसिक स्थितीवरून अथवा एकंदर वर्तनावरून, पक्षकारांचें मनोगत किंवा इंगित[1] जाणण्यास, साधारणपणें कधीं कधीं पुष्कळ अंशीं मदत होते. केव्हां केव्हां तर असेंही दृष्टीस पडतें कीं, मनुष्याच्या हातून कांहीं विशेष अपराध घडला असल्यास, किंवा त्याच्या हातून एकादें अघटित दुर्वर्तन, अथवा खोडसाळ कृत्य झालें असल्यास, त्याचें वदन म्लान होऊन त्याची सर्व टवटवी जाते; आणि त्याच्यावर कालिमेची झांक मारते. क्वचित् प्रसंगीं, असत्य भाषण केल्यामुळें, त्याचें अंग व हातपाय कांपूं लागतात; त्याच्या बोलण्याचालण्यांत अगदींच धरबंध राहत नाहीं; आणि त्याच्या मनाची स्थिरता उडाल्या कारणानें, तें फारच उद्विग्न झालेलें दृष्टीस पडतें. तेव्हां अशा सर्व बाह्यसाधनांचा समावेश अप्रत्यक्ष प्रमाणांतच करण्याचा आहे. आतां, कधीं कधीं अशा प्रकारची स्थिति भीतीनें, किंवा छल झाल्याकारणानें, होण्याचा संभव असतो. परंतु, सारासार विचार करूनच त्यापासून अनुमान काढण्याचें आहे. आणि पुराव्याचीं सदहूं सर्व साधनें केवळ एकदेशीय असल्यामुळेंच,

---

१ आकारैरिंगितैर्गत्या चेष्टया भाषितेन च ।
नेत्रवक्त्रविकारैश्च गृह्यतेंतर्गतं मनः ॥ २६ ॥
( म. स्मृ. अ. ८. )

तीं अप्रत्यक्ष प्रमाणांत गणलीं आहेत. कारण तेवढयावरूनच निश्चयात्मक असें अनुमान करण्यास पुष्कळ अडचणी येऊं पाहतात.

क्रिया, व शपथ, आणि तत्संबंधीं प्राचीन काळची समज.

कधीं कधीं, प्रमाणाऐवजीं क्रिया देखील करण्याची चाल आमच्या लोकांत आहे. ह्मणजे अग्निस्पर्श करून, किंवा जलनिमज्जन करून, अथवा पुत्रदारादि आप्तवर्गाच्या डोक्यावर हात ठेवून, अमुक एक प्रकारची हकीकत आहे किंवा नाहीं, ह्मणून शपथ करणें. अशा प्रकारच्या अग्निस्पर्शादि भयप्रद क्रिया, मनुस्मृतिकाराच्या[१] वेळीं देखील, अगदीं जारीनें सुरू होत्या असें दिसतें. आणि तसल्या उग्र क्रिया जरी सांप्रतकाळीं प्रचारांत नाहींत तरी, गंगेच्या पवित्रोदकांत प्रवेश करणें, पुत्रदारादिकांस स्पर्श करणें, देवालयांत शिरणें, तुलसीदल अथवा तांदूळ हातीं घेणें, वगैरे सौम्य क्रिया, आजमितीसही, सर्वत्र अमलांत आहेत.

अशा प्रकारची क्रिया करणारास, त्याची हकीकत खरी असल्यास, ती बाधक होत नाहीं, अशी आमच्या

१ अग्निं वाहारयेदेनमप्सु चैनं निमज्जयेत् ।
पुत्रदारस्य वाप्येनं शिरांसि स्पर्शयेत्पृथक् ॥ ११४ ॥
( म. स्मृ. अ० ८ )

पूर्वजांची समजूत[1] असे. म्हणजे अग्नीचा स्पर्श केला असतां, तो दाह करीत नाहीं. उदकांत प्रवेश केला असतां, तें क्लेश करीत नाहीं. आणि पुत्रदारादिकांचा स्पर्श केला तरी, त्यापासून दुःख, किंवा संकट, प्राप्त होत नाहीं. ह्याविषयीं एक पूर्वींच्या काळची गोष्ट **मनुस्मृतींत**[2] सांगितली आहे. ती अशी कीं, **वत्स** नामक ऋषीला त्याचा धाकटा भाऊ **वैमात्रेय** हा असें म्हणाला कीं, तूं **ब्रह्म**बीजाचा नसून **शूद्राच्या** पोटचा आहेस. त्यावरून **वत्स**-ऋषीला फार वाईट वाटून, आपण **ब्राह्मण**बीजाचेच आहोंत, असें सिद्ध करून दाखविण्याकरितां त्यानें अग्नींत प्रवेश केला. परंतु त्यांत तो बिलकुल दग्ध झाला नाहीं. इतकेंच नाहीं तर, त्याच्या केंसालाही धक्का लागला नाहीं; यामुळें तो **ब्रह्म**बीजाचाच, असें ठरलें. आतां, ही हकीकत किती अंशानें खरी असेल ती असो. तथापि, त्याचा अनुभव सांप्रत काळीं तरी निदान नाहीं; व अग्नीनें आपली नैसार्गिक दाहकशक्ति, तितक्याच वेळेपुरती, कां व कशी टाकावी; अथवा ह्या नेहमींच्या सृष्टिनियमांत,

---

१ यमिद्धो न दहत्यग्निरापो नोन्मज्जयंति च ॥
न चार्तिमृच्छति क्षिप्रं स ज्ञेयः शपथे शुचिः ॥ ११५ ॥

२ वत्सस्य ह्यभिशस्तस्य पुरा भ्रात्रा यवीयसा ॥
नाग्निर्ददाह रोमापि सत्येन जगतः स्पृशः ॥ ११६ ॥

( म. स्मृ. अ. ८ )

असल्या प्रकारचा बदल कोणत्या हेतूनें व्हावा; अशा- विषयीं समाधानकारक खुलासा आजपर्यंत झाला अस- ल्याचें कळून येत नाहीं.

भोळ्यासमजूतीचीं कारणें.

असो. ह्या जगत्तलावरील एकंदर सर्व राष्ट्रांची स्थिति पाहतां असें दिसून येतें कीं, कित्येक गोष्टी कल्पित असतांही त्या मनुष्या च्या प्रथमावस्थेंत खऱ्याशा भासतात. आरंभीं सर्व लोकांच्या मनाची बाल्यावस्थाच असल्यामुळें, निमित्तमात्र कारण भयप्रद होतें. विशेष अवलोकन झालें नसल्याकारणानें, केवळ साधारण सृष्टिचमत्कार देखील दैविकसे वाटतात. आणि एकंदर विचार, शास्त्रीय विष- यांच्या प्रत्येक शाखेंत, प्रगल्भतेप्रत पावले नसल्यामुळें, यत्किंचित् न्यूनाधिकत्वानें देखील सत्यताच भासूं लागतें. **बागुलबोवा** निव्वळ खोटा असून, व त्याला बिलकूल अस्ति- त्व नसतांही, त्याचें लहानपणीं अतोनात भय वाटतें; अथवा एखादा **उल्कापात** पाहून, महदाश्चर्य उद्भवलेसें दिसतें. **चंद्रसूर्यांस** ग्रहण लागलेलें पाहून, रानटी अवस्थेंतील लोकांस भीति वाटते. तसेंच, एखादा तेजःपुंज **धूमकेतु** दृग्गोचर झाला ह्मणजे, अज्ञजनांस विलक्षण चमत्कार वाटतो. परंतु ह्या सर्व गोष्टींपैकीं, एकीचेंही भय, अथवा नवल, सुजाण मनुष्यास, किंवा शास्त्रज्ञास, वाटत नाहीं. त्याचें कारण हेंच कीं, **खगोलां**तील ग्रहांच्या परिवर्तनाचे

नियम त्यांस अवगत असल्यामुळें, एकंदर सृष्टिरचनेंतील ठळक ठळक गोष्टी त्यांस माहीत असतात.

आतां, लोकमतावर ज्ञानाचा संस्कार घडण्यास अडचण आली, म्हणजे कधीं कधीं ऐकलेलें सर्वच खरें भासतें. अथवा मनावर चांगला ठसा उमटण्याकरितां, क्वचित् प्रसंगीं दाखल्यासाठीं दिलेलें कल्पित उदाहरण देखील खरें वाटतें. किंवा, त्यांत थोडासा तथ्यांश असला तरी, विकारविलसितामुळें पराचें पाखरूं बनतें; व पिसाचा कावळा होतो. याविषयीं प्रसिद्ध इतिहासकार **बकल्**[१] असें लिहितो कीः–

" Hence it was that historians were able to accumulate fables which were believed without examination ; it being altogether forgotten, that fables as Voltaire says, begin to be current in one generation, are established in the second, become respectable in the third, while in the fourth generation temples are raised in honour of them."

असो. ह्याप्रमाणेंच, सदरीं लिहिलेल्या अग्निक्रियेचा प्रकार असण्याचा संभव आहे.

लेखी पुरावा नसेल, आणि प्रत्यक्षतेचा साक्षिपुरावा मिळण्यास अडचण पडेल, तर पक्षकारांनीं आपापल्या हकी-

History of civilization in England by Henry Buckle: Vol. II. P. 313. New. Edition.

कतीविषयीं शपथ[1] घेऊन खरा मजकूर सांगावा, असें स्मृतिवचन आहे.

प्रत्यक्ष प्रमाण.

२ प्रत्यक्ष प्रमाणाविषयीं मनुस्मृतींत बरेंच विवेचन केल्याचें दृष्टीस पडतें. प्रथमतः कोण कोण साक्षी असावेत, अशाविषयीं थोडेंसें वर्णन करून, तदनंतर त्याचीं कारणें सांगितलीं आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र यांपैकीं कोणत्याही जातीचा साक्षीदार असला तरी हरकत नाहीं; परंतु तो वजनदार आणि कुटुंबवत्सल[2] असावा. कारण, तो बचडवाला असला ह्मणजे, त्याला ग्रामस्थांची भीति व दाब असतो; त्यामुळें असत्य भाषण करून, किंवा न्यायाधीशासमोर खोटी जबानी देऊन, त्यांची अप्रीति संपादण्यास तो सहसा धजत नाहीं. कोणी स्वकीय आप्त[3] असेल तरी त्यांची साक्ष देण्यास हरकत नाहीं. मात्र ते धर्माधर्मविचार, कुलाचार, व शिष्टाचार, यांत प्रविण असावेत. कोणत्या प्रकारचे साक्षी काय कारणांनीं वर्ज्य आहेत,

---

१ असाक्षिकेषु त्वर्थेषु मिथो विवदमानयोः ।
अविन्दन्तत्त्वतः सत्यं शपथेनापि लंभयेत् ॥ १०९ ॥

२ गृहिणः पुत्रिणो मौलाः क्षत्रविट्शूद्रयोनयः ।
अर्थ्युक्ताः साक्ष्यमर्हंति न ये केचिदनापदि ॥ ६२ ॥

३ आप्ताः सर्वेषु वर्णेषु कार्याः कार्येषु साक्षिणः ।
सर्वधर्मविदो लुब्धा विपरीतांस्तु वर्जयेत् ॥ ६३ ॥

( म. स्मृ. अ. ८ )

साक्षीदारांसंबंधीं वर्ज्यावर्ज्य विचार.

याविषयीं देखील उल्लेख **स्मृतिकारांनीं** केला आहे. ह्या वर्ज्य केलेल्या साक्षीपैकींच राजा, श्रोत्रीय, ब्रह्मचारी, परिव्राजक, सन्यासी, इत्यादि होत. आतां, राजाची साक्ष न देण्याचें कारण येवढेंच कीं, त्याच्या प्रभुत्वामुळें त्याला हवेतसे अडवे तिडवे प्रश्न करण्यास अडचण पडते. तसेंच, श्रोत्रिय, ब्रह्मचारी, परिव्राजक, चतुर्थाश्रमी, इत्यादिकांस त्या त्या आश्रमांतील कर्में यथासांग-करण्याचीं असल्या कारणानें, त्यांजला अगदींच फुरसूद मिळत नाहीं. सबब त्यांची साक्ष देखील वर्ज्यच आहे. शिवाय कारागीर, नटनर्तक, आचारी, वगैरे धंदेवाले लोकांची साक्ष देखील सहसा देऊं नये. कारण, एक तर कामाच्या व्यापृतीमुळें ते नेहेमींच व्यग्र असतात; व दुसरें असें कीं, त्यांच्या दरज्याप्रमाणें, ते धनलोभास गुंतण्याचा पुष्कळच संभव असतो. तसेंच अर्थसंबंधीं, कर्जबाजारी, ओढघस्त, स्वशत्रु किंवा त्यास सहाय्य करणारा, आपलें न्यूनाधिक पाहून उणें काढणारा, रोगपीडित झालेला, अनेक कारणांनीं दूषित असलेला, खोटें बोलणारा, अत्यंत परतंत्र, गर्भदास, गुलाम, क्रूरकर्म कर-

---

१ न साक्षी नृपतिः कार्यो न कारुककुशीलवौ ।
न श्रोत्रियो न लिंगस्थो न संगेभ्यो विनिर्गतः ॥ ६५ ॥
( म. स्मृ. अ. ८ )

णारा, निषिद्धकर्म आचरणारा, विकलेंद्रिय, वृद्ध, बालक, आर्त, मत्त, उन्मत्त, चोर, तस्कर, क्षुधातृषादिकारणांनीं पीडित झालेला, श्रम होऊन दमलेला, कामवासनेनें व्यापलेला, आणि क्रोधाग्नीनें खवळलेला, इत्यादिकांची साक्षही बिलकुल देऊं नये. कारण, त्यांच्या मनाची समता, सारासार विचार, आणि पापभीरुत्व, हीं त्यांच्यांत बिलकुल वास करीत नसल्यामुळें, त्यांच्याकडून खरा प्रकार कळण्याचा अगदींच संभव नसतो.[1]

पुराव्यांतील ग्राह्य गोष्टी.

साक्षीदाराचा कोणत्याही प्रकारें छल न करितां, जेवढी ह्मणून हकीकत तो सांगेल तेवढीच पुराव्यांत ग्राह्य धरावयाची आहे. तसेंच, साक्षीदारावर कोणत्याही तऱ्हेचा अन्यायमूलक दाब न होतां जितकें त्याच्या

१ नार्थसंबंधिनो नाप्ता न सहाया न वैरिणः ॥
न दृष्टदोषाः कर्तव्या न व्याध्यार्ता न दुषिताः ॥ ६४ ॥
नाध्यधीनो न वक्तव्यो न दस्युर्न विकर्मकृत् ।
न वृद्धो न शिशुर्नैको नान्त्यो न विकलेन्द्रियः ॥ ६५ ॥
नार्तो न मत्तो नोन्मत्तो न क्षुत्तृष्णोपपीडितः ।
न श्रमार्तो न कामार्तो न क्रुद्धो नापि तस्करः ॥ ६७ ॥
( म. स्मृ. अ. ८ )

२ सत्यमर्थं च संपश्येदात्मानमथ साक्षिणः ।
देशं रूपं च कालं च व्यवहारविधौ स्थितः ॥ ४५ ॥
ह्या श्लोकावर कुल्लूकभट्ट खालीं लिहिल्याप्रमाणें टीका करितातः—
" व्यवहारदर्शनप्रवृत्तो राजा छलमपहाय सत्यं पश्येत्तथार्थं च ॥ "

तोंडाबाहेर निघेल, तितकेंच न्यायाच्या कामीं ग्राह्य समजावयाचें. आणि मोहादि कारणांनीं त्याच्या मनाची भ्रष्टता न होतां, किंवा भयादि कारणांनीं त्याची मनोव्यग्रता न घडतां, तो यदृच्छया व स्वभावतः[1]च जें कथन करील, तेंच प्रमाणग्राह्य होय. ह्याप्रमाणें न्यायाचें खरें तत्व असल्या कारणानें १ लोभ, २ मोह, ३ भय, ४ स्नेहभाव, ५ काम, ६ क्रोध, ७ अज्ञान, आणि ८ बालभाव, इत्यादि निमित्तांनीं जी साक्ष झाली असेल, ती निष्फल व निष्प्रयोजन समजावी.[2]

सांप्रतकाळीं, **हिंदुस्थानां**त जे जे **इंग्रजी**[3] कायदे अमलांत आहेत, त्यांचें देखील मूलतत्त्व याच पद्धतीवर, व धोरणावर आहे, असें त्या कायद्यांचें अवलोकन केल्यानें, कोणाच्याही सहजीं लक्षांत येण्यासारिखें आहे.

---

१ स्वभावेनैव यद्ब्रुयुस्तद्ग्राह्यं व्यावहारिकम् ।
अतो यदन्यद्विब्रूयुर्धर्मार्थं तदपार्थकम् ॥ ७८ ॥

२ लोभान्मोहाद्भयान्मैत्रात्कामात्क्रोधात्तथैव च ।
अज्ञानाद्बालभावाच्च साक्ष्यं वितथमुच्यते ॥ ११८ ॥

( म. स्मृ. अ. ८ )

3 The Indian Penal Code. (act No. 45 of 1860]. S. S. 90-94.

The Criminal Procedure Code. (act No. 10 of 1882). S. 163.

The Indian Evidence Act. (No. I of 1872). S. S. 25, 26, 28.

उपलब्ध असलेला साक्षीदार घेण्याची अवश्यकता.

क्वचित् प्रसंगीं, सदरीं लिहिल्याप्रमाणें, उक्तलक्षणोपेत असा साक्षिदार मिळण्यास अगदींच इलाज नसतो. ह्मणजे गृहाभ्यंतरीं, अरण्यांत, व संकट समयीं, शरीराला क्लेश झाले आहेत अशा वेळीं, देहावर घाव पडले आहेत अशा काळीं, अथवा चोर तस्करांनीं लुटले आहे अशा अवसरीं, योग्य साक्षी मिळण्यास अडचण पडते. अशा प्रसंगीं उपलब्ध असलेला कोणताही साक्षीदार देण्यास हरकत नाहीं, म्हणून स्मृतिवचन[1] आहे.

ब्राम्हण[2], क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र, या वर्णांनीं होतां होई तों आपापल्या वर्णांतीलच साक्षी योजावेत. तसेंच, स्त्रियांनींही स्त्री जातींतीलच पुरावा देण्याविषयीं योजना करावी. परंतु, तसे साक्षीदार नच मिळाल्यास, उपलब्ध असलेला जो अन्य पुरावा मिळेल, तो देण्यास हरकत नाहीं. स्त्रियांची साक्ष स्त्रियांनीं देण्याविषयीं जो

---

१ अनुभावी तु यः कश्चित्कुर्यात्साक्ष्यं विवादिनाम् ।
अन्तर्वेश्मन्यरण्ये वा शरीरस्यापि चात्यये ॥ ६९ ॥
स्त्रियाप्यसंभवे कार्यं बालेन स्थविरेण वा ।
शिष्येण बंधुना वाऽपि दासेन भृतकेन वा ॥ ७० ॥

२ स्त्रीणां साक्ष्यं स्त्रियः कुर्युर्द्विजानां सदृशा द्विजाः ।
शूद्राश्च संतः शूद्राणामन्त्यानामन्त्ययोनयः ॥ ६८ ॥
( म. स्मृ. अ. ८ )

नियम सांगितला, तो केवळ कित्येक अडचणीच्या गोष्टींत स्त्रीच्या लज्जेचें रक्षण व्हावें. व तिला धक्का बसूं नये, या हेतूनेंच केला असल्याचें दिसतें. आणि आमच्या **स्मृति** कारांची अशा प्रकारची जी मार्मिक सूचना, ती त्यांच्या मर्मज्ञतेची, व दूरदृष्टीची, केवळ व्यंजकच होय.

ग्राह्य व अग्राह्य गोष्टींचें विवेचन.

न्यायसंसदीं पक्षकार हजर झाल्यानंतर, त्यांच्या साक्षीवरून कोणता मजकूर किती अंशानें खरा मानावयाचा, अथवा, प्रत्येकाच्या हकीकतीच्या संबंधानें एकंदर जबानीवरून किती तथ्यांश गृहीत धरावयाचा, किंवा, वादीप्रतिवादी यांच्याच सांगण्यांवरून, अन्य तऱ्हेचा दुसरा पुरावा नसल्यास, त्यांच्या दाव्यासंबंधीं कसा फैसल्ला द्यावयाचा, याविषयीं **मनुस्मृतींत** बरेंच विवेचन केलेलें दृष्टीस पडतें.

अमुक एक वस्तु आपली आहे असें जो कोणी प्रतिपादन करील, त्यानें ती गोष्ट शाबीद करण्यासाठीं, तत्संबंधीं संपूर्ण वर्णन दिलें पाहिजे. ह्मणजे आपलें धन, अथवा हरएक चीज नाहींशी झाली असेल, किंवा चोरीस गेली असेल तर, एकंदर किती डाग होते, ते केव्हां नाहींसे झाले, कोठें नाहींसे झाले, कशा प्रकारें गेले, त्यांचा रंग कसा होता, ते कसल्या स्वरूपाचे होते, व कशा स्थितींत होते, ह्मणजे पेटींत होते किंवा खुले होते,

वगैरे तपशिलाचें इत्थंभूत वर्णन देणें अगदीं अवश्य आहे. आणि अशा प्रकारें दिलेल्या तपशिलाचा व सांपडलेल्या वस्तूचा मुकाबिला मिळाला, ह्मणजे ती वस्तु मालकाची असें समजून, त्यास देण्यास हरकत[१] नाहीं. परंतु त्यांत कांहींच मेळ नसल्यास, अथवा जरूर ती माहिती देण्यास मालक असमर्थ असल्यास, त्याचा दावा शाबीद नाहीं असें समजून, तो रद्द करावा.

जो कोणीः—

१ असंभवनीय असलेल्या गोष्टीचा प्रथमतः पुरावा देऊन नंतर नाकबूल जाईल; अथवा

२ एकदां जी जबानी दिली आहे, त्याविरुद्ध असंबद्ध असा अन्य मजकूर सांगेल; किंवा

३ एकादी गोष्ट अमुक प्रकारची आहे असे प्रथम सांगून, दुसऱ्या प्रसंगीं ती निराळ्याच तऱ्हेची आहे असें कथन करील, आणि ह्या असंबद्धतेबद्दल समाधानकारक असा कांहींच खुलासा करणार नाहीं; किंवा

४ विचारलेल्या प्रश्नाचें सरळ उत्तर देणार नाहीं; किंवा

५ साधकबाधक गोष्टींचा विचार न करितां, कांहीं तरी अप्रमाणपूर्वक सांगेल; अथवा

---

१ ममेदामिति यो ब्रुयात्सोऽनुयोज्यो यथाविधि ।
संवाद्य रूपसंख्यादीन्स्वामी तद्द्रव्यमर्हति ।। ३१ ।।
(म. स्मृ. अ. ८)

६ आपले साक्षीदार आहेत असें प्रथम सांगून त्यांचीं नांवें कळविणार नाहीं; तर

त्याचा पक्ष निर्बल समजून, त्याच्या विरुद्ध पुरावा झाला असें समजावें.[1]

ज्या गोष्टी चक्षुर्ग्राह्य आहेत तत्संबंधीं, साक्षात् पाहिल्याचा पुरावा बस्स आहे; तसेंच ज्या गोष्टी श्रोत्रग्राह्य आहेत त्याबद्दल, प्रत्यक्ष ऐकिल्याचा पुरावा बस्स आहे, असें स्मृतिकार[2] ह्मणतात. दुसरा महत्वाचा, आणि ध्यानांत ठेवण्यासारखा, पुराव्याचा नियम असा आहे कीं, मुद्दाम साक्षीदार ह्मणून ठेविलें नसतांही, जो कोणी यदृच्छया कांहीं व्यवहार पाहील किंवा ऐकील तर, त्यानें देखील ती पाहिलेली

१ अदेश्यं यश्च दिशति निर्दिश्यापन्हुते च यः ।
यश्चाधरोत्तरानर्थान्विगीतान्नावबुध्यते ॥ ५३ ॥
अपदिश्यापदेश्यं च पुनर्यस्त्वपधावति ।
सम्यक्प्रणिहितं चार्थं पृष्टः सन्नाभिनन्दति ॥ ५४ ॥
असंभाष्ये साक्षिभिश्च देशे संभाषते मिथः ।
निरुच्यमानं प्रश्नं च नेच्छेद्यश्चापि निष्पतेत् ॥ ५५ ॥
ब्रूहीत्युक्तश्च न ब्रूयादुक्तं च न विभावयेत् ।
न च पूर्वापरं विद्यात्तस्मादर्थात्स हीयते ॥ ५६ ॥
साक्षिणः संन्ति मेत्युक्त्वा दिशेत्युक्तो दिशेन्न यः ।
धर्मस्थः कारणैरेतैर्हीनं तमपि निर्दिशेत् ॥ ५७ ॥
२ समक्षदर्शनात्साक्ष्यं श्रवणाच्चैव सिध्यति ।
तत्र सत्यं ब्रुवन्साक्षी धर्मार्थाभ्यां न हीयते ॥ ७४ ॥

( म. स्मृ अ. ८ )

अथवा ऐकलेली सर्व हकीकत, यथातथ्य, अवश्य[1] सांगावी. आणि अशा प्रकारचा, तथ्य सांगणारा, अलुब्ध, व निस्पृह साक्षी, एकच[2] असला तरी बस्स असून, अभरंवशाचे आणि वायकळ साक्षीदार अनेक असले तथापि, तेउघडच कांहीं कामाचे नाहींत. व ही गोष्ट प्रमाणशास्त्रान्वयेंच सिद्ध ठरली असल्या कारणानें, ती अजून देखील सर्वमान्य आहे.

पुराव्याचें बलाबल.

एकंदर पुरावा कशा प्रकारें केव्हां गृहित धरावयाचा, याविषयीं सदरीं लिहिल्याप्रमाणें विवेचन केल्यानंतर, उपलब्ध असलेला पुरावा कोणत्या प्रमाणानें बलवत्तर मानावा, हें सांगितलें आहे. सर्व साक्षीदारांची एकसारखी जबानी नसून, त्यांत भिन्न भिन्न मजकूर असेल तर, जे साक्षीदार जास्त प्रमाणानें असतील त्यांची हकीकत गृहित धरावी. परंतु ते सम असल्यास, त्यांतच सत्यादि गुणांनीं जे अधिक अलंकृत असतील, त्यांजवर विशेष भरंवसा ठेवावा. आणि त्यांतही द्विधा प्रकार असल्यास, उत्तम **ब्राह्मणांची** साक्ष प्रमाण मानावी,[3] असें **स्मृतिकार** लिहितात.

---

१ यत्रानिबद्धोऽपीक्षेत श‍ृणुयाद्वाऽपि किंचन ।
दृष्टस्तत्रापि तद्ब्रूयाद्यथादृष्टं यथाश्रुतम् ॥ ७६ ॥

२ एकोऽलुब्धस्तु साक्षी स्याद्बह्वयः शुच्योऽपिनस्त्रियः ।
स्त्रीबुद्धेरस्थिरत्वात्तु दोषैश्चान्येऽपि ये वृताः ॥ ७७ ॥

३ बहुत्वं परिगृह्णीयात्साक्षिद्वैधे नराधिपः ।
समेषु तु गुणोत्कृष्टान्गुणिद्वैधे द्विजोत्तमान् ॥ ७३ ॥

( म. स्मृ. अ. ८ )

लेख्यप्रमाण.

३ सर्व प्रमाणांत फारच महत्वाचें असें लेख्यप्रमाण होय. याविषयीं मनुस्मृतींत प्रसंगानुसार ठिकठिकाणीं बराच उल्लेख आढळतो. दिलेल्या इतर पुराव्यानें कार्यभाग झाला नाहीं तर, विशेष पुष्टीकरणार्थ लेखी पुरावा दाखल करावा. ऋणको दिलेलें ऋण नाकबूल करील तर, धनकोनें तत्संबंधीं झालेले दस्तऐवज[1] हजर करून, न्यायाधीशाची खात्री करावी. आणि क्वचित् प्रसंगीं, मुदतीबरहुकूम कर्जाची फेड करण्यास ऋणको असमर्थ होईल तर, त्यानें पुनश्च तत्संबंधीं नूतन लेख धनकोस करून[2] द्यावे.

जबरीनें करून घेतलेल्या दस्तऐवजाचा परिणाम.

तथापि, क्वचित् प्रसंगीं जर कोणीही आपल्या पोळीवरच तूप ओंतण्यासाठीं दुसऱ्यापासून बलात्कारानें लेख करून घेतला असेल, अथवा कांहीं बलात्कार झाल्यामुळें कोणी कोणास कांहीं दिलें असेल, किंवा केवळ फसला गेल्यामुळें कोणी कांहीं बोलला असेल तर, त्याप्रमाणें बिलकुल अम्मल न करितां, तें यच्चावत् सर्व रद्द[3] समजलें

१ अपन्हवेऽधमर्णस्य देहीत्युक्तस्य संसदि ।
अभियोक्ता दिशेद्देश्यं करणं वाऽन्यदुद्दिशेत् ।। ५२ ।।

२ ऋणं दातुमशक्तो यः कर्तुमिच्छेत्पुनः क्रियाम् ।
स दत्त्वा निर्जितां वृद्धिं करणं परिवर्तयेत् ।। १५४ ।।

३ बलाद्दत्तं बलादुक्तं बलाद्यच्चापि लेखितम् ।
सर्वान्बलकृतानर्थानकृतान्मनुरब्रवीत् ।। १६८ ।।

(म. स्मृ. अ. ८)

पाहिजे. आणि ज्या ज्या दाव्यांत, किंवा खटल्यांत, खोटी साक्ष दिल्याचें निश्चयात्मकपणें समजत असेल, त्या दाव्याचा किंवा त्या खटल्याचा निकाल झाला असला तथापि, त्याची पुनश्च फेरतपासणी करावी, असें स्पष्ट[1] सांगितलें आहे.

## कराराचा कायदा.

करार.

करारासंबंधीं विवेचनांत, विशेष महत्वाच्या अशा चार गोष्टींचा उल्लेख केलेला दृष्टीस पडतोः—

१ प्रतिभूत्वाविषयीं ( म्हणजे जामिनकीविषयीं );
२ क्रयविक्रयाविषयीं;
३ वेतनाविषयीं; आणि
४ निक्षेप म्हणजे ठेव, किंवा तारणगहाण, यांविषयीं.

जामिनकी.

१ जो कोणी ऋणकोस हजर जामीन राहील, त्यानें मुदतीबरहुकूम त्यास हजर केलें पाहिजे. आणि त्याप्रमाणें तो करण्यास चुकेल तर, त्यानें जामिनकीबद्दल धनकोच्या ऋणाची फेड स्वतःच केली पाहिजे. तथापि, याखालीं निर्दिष्ट

१ यस्मिन्यस्मिन्विवादे तु कौटसाक्ष्यं कृतं भवेत्।
तत्तत्कार्यं निवर्तेत कृतं चाप्यकृतं भवेत् ॥ ११७ ॥

२ यो यस्य प्रतिभूस्तिष्ठेद्दर्शनायेह मानवः।
अदर्शयन्स तं तस्य प्रयच्छेत्स्वधनादृणम् ॥ १५८ ॥
( म. स्मृ. अ. ८ )

केलेल्या जामीनकीबद्दल कोणीही जबाबदार धरलें जाणार नाहीं:—

१ वृथादान, ह्मणजे थट्टेनें कोणास जामीन राहणें, अथवा परिहासनिमित्त जामिनकीची रक्कम देण्याचें कबूल करणें;

२ द्यूत निमित्तानें, किंवा इतर व्यसनानें झालेलें कर्ज;

३ सुरापानानें झालेलें ब्रह्मस्व; आणि

४ दस्तुऱ्या, व नाकीं, इत्यादि संबंधानें अंगावर आलेली जामीनगत.

त्या प्रमाणेंच:—

५ मदोन्मत्त झालेले,

६ आधिव्याधींनीं पीडित असलेले,

७ बालक,

८ वृद्ध, किंवा

९ परतंत्र, इत्यादिकांनीं केलेला ऋणादानाचा व्यवहार[2];

१० बलात्कारानें अथवा छलानें झालेली, ठेवीची किंवा तारणगहाणाची[3] विक्री; आणि

---

१ प्रातिभाव्यं वृथादानमाक्षिकं सौरिकं च यत् ।
दंडशुल्कावशेषं च न पुत्रो दातुमर्हति ॥ १५९ ॥

२ मत्तोन्मत्तार्ताध्यधीनैर्बालेन स्थविरेण वा ।
असंबद्धकृतश्चैव व्यवहारो न सिद्धयति ॥ १६३ ॥

३ योगाधमनविक्रीतं योगदानप्रतिग्रहम् ।
यत्र वाऽप्युपधिं पश्येत्तत्सर्वं विनिवर्तयेत् ॥ १६५ ॥

( म. स्मृ. अ. ८ )

११ शास्त्रीयधर्म, पूर्वीपासून चालत आलेली परंपरा, व सद्व्यवहार, यांविरुद्ध कोणतीही गोष्ट कबूल केली असेल[1], अथवा लिहून दिली असेल तरी, अशा प्रकारचा सर्व व्यवहार अगदीं बेकायदेशीर, आणि बातल होय.

जर कोणी[2] कोणास कांहीं रकमेस जामीन राहिला असेल, आणि त्या रकमेची फेड होत नसेल, तर त्यानें ती रकम पदरच्या पैशांतून देऊन, ऋणमुक्त व्हावें. परंतु एकाद्या प्रसंगीं, केवळ स्वामि-कुटुंबपोषणार्थ, अथवा तन्निमित्त दुसऱ्या कांहीं योग्य कारणासाठीं एकाद्या सेवकजनानें, स्वदेशी किंवा परदेशीं, आपल्या जिम्यावर कांहीं कर्ज घेतलें असेल, तर त्या काढलेल्या कर्जाची फेड मालकानेंच केली पाहिजे.

क्रयविक्रय.

२ जो ज्या वस्तूचा मालक नसेल, त्यानें ती वस्तु दुसऱ्यास दिली, किंवा तिचा विक्रय केला, तर त्या वस्तूचा कायदेशीर रीतीनें कांहींच व्यवहार झाला नाहीं, असें समजावयाचें.[3]

---

१ सत्या न भाषा भवति यद्यपि स्यात्प्रतिष्ठिता ।
बहिश्चेद्भाष्यते धर्मान्नियताद्व्यावहारिकात् ।। १६४ ।।

२ निरादिष्टधनश्चेत्तु प्रतिभूः स्यादलंधनः ।
स्वधनादेव तद्दद्यान्निरादिष्ट इति स्थितिः ।। १६२ ।।

३ अस्वामिना कृतो यस्तु दायो विक्रय एव वा ।
अकृतः स तु विज्ञेयो व्यवहारे यथा स्थितिः ।। १९९ ।।

( म. स्मृ. अ. ८ )

एकाद्या वस्तूची गैरकायदा विक्री झाली असतांही, तिचा मालक मरण पावल्यामुळें, अथवा तो देशांतरी गेल्यामुळें, ती तो सोडवूं शकत नसेल तर, ज्या मनुष्यानें अशी बेकायदा विक्री केली असेल, त्याजपासून दंड घेऊन राजानें त्यास सोडून द्यावें. मात्र, तिचा मालक असल्यास, त्यानें त्या वस्तूची अर्धी किंमत विकत घेणारास देऊन, ती त्याजकडून सोडवून[1] घ्यावी. आतां, ही व्यवस्था प्रजेचें कल्याण, व न्याय, ह्यांस किति अनुसरून आहे, हें वाचकांच्या तावडतोब लक्षांत येण्यासारिखें आहे.

मालकाची मूळ वस्तु ओळखतां येऊं नये एतदर्थ, तींत[2] भेळ घालून, अथवा न्यूनाधिक करून, किंवा छेपवून, कोणत्याही प्रकारें फेरबदल करूं नये.

जर कोणी एकाद्या वस्तूची[3] खरेदी केली असेल, किंवा ती विकली असेल, आणि त्यानंतर त्या कृतव्यवहाराबद्दल त्यास पश्चात्ताप झाला असेल तर, दहा दिवसांच्या आंत त्यानें ती वस्तु परत द्यावी, अथवा घ्यावी. परंतु त्या मुद-

१ अथ मूलमनाहार्यं प्रकाशक्रयशोधितः ।
अदंड्यो मुच्यते राज्ञा नाष्टिको लभते धनम् ॥ २०२ ॥

२ नान्यदन्येन संसृष्टरूपं विक्रयमर्हति ।
न चासारं न च शून्यं न दूरेण तिरोहितम् ॥ २०३ ॥

३ क्रीत्वा विक्रीय वा किंचिद्यस्येहानुशयो भवेत् ।
सोऽतर दशाहात्तद्द्रव्यं दद्याच्चैवाऽऽददीत च ॥ २२२ ॥

( म. स्मृ. अ. ८ )

तीनंतर, सदरहू देवघेवींत यत्किंचित्ही बदल व्हावयाचा नाहीं.[1]

याप्रमाणें अनेक प्रकारचे नियम सांगून शेवटीं थोडक्यांत असें सांगितलें आहे कीं, देशबांधवांबरोबर हरएक प्रकारचा यथोक्त करार करून, जो कोणी तो सिद्धीस न नेतां मोडील, त्यास[2] हद्दपार करावें.

वेतन.

३ जो नोकर स्वतः आजारी[3] नसतांही, आपण कबूल केलेलें काम केवळ दर्पानेंच करीत नाहीं, त्यास दंड करावा आणि वेतनही देऊं नये. परंतु जर तो व्याधिपीडित असेल, आणि बरा झाल्यावर आपल्या बोलीप्रमाणें काम करील तर, त्यास वेतन द्यावें[4].

४ निक्षेपाचे दोन प्रकार सांगितले आहेत. १ तारणगहाण, आणि २ ठेव. वस्त्रालंकार, जमीन, गोधन,

---

१ परेण तु दशाहस्य न दद्यान्नापि दापयेत् ।
आददानो ददच्चैव राज्ञा दंड्यः शतानि षट् ॥ २२३ ॥

२ यो ग्रामदेशसंघानां कृत्वा सत्येन संविदम् ।
विसंवदेन्नरो लोभात्तं राष्ट्राद्विप्रवासयेत् ॥ २१९ ॥

३ भृतो नार्तो न कुर्याद्यो दर्पात्कर्म यथोदितम् ।
स दंड्यः कृष्णलान्यष्टौ न देयं चास्य वेतनम् ॥ २१५ ॥

४ आर्तस्तु कुर्यात्स्वस्थः सन्यथाभाषितमादितः ।
स दीर्घस्यापि कालस्य तल्लभेतैव वेतनम् ॥ २१६ ॥

( म. स्मृ. अ. ८ )

निक्षेप.

उंट, घोडे, वगैरे तारण ठेवण्याची चाल, फार प्राचीन काळापासूनच, इकडे सुरू होती, असें मनुस्मृतीवरून दिसून[1] येतें. ठेविलेलें तारण, अथवा ठेव, हीं दीर्घकालपर्यंत राहिलीं असलीं तथापि, त्यांच्या मालकानें तत्संबंधीं मागणें केल्याबरोबर तीं त्यास परत[2] दिलीं पाहिजेत.

तारणगहाण.

तारणगहाण ह्मणून ठेविलेल्या वस्तूचा उपभोग, मालकाच्या मर्जीविरुद्ध, बलात्कारानें घेऊं नये, आणि तो घेण्याचा प्रसंगच आल्यास, तिचें निदान व्याज तरी सोडून द्यावें. शिवाय, क्वचित् प्रसंगीं त्या वस्तूचा उपभोग घेतल्या कारणानें ती निःसत्व झाली असल्यास, त्या नुकसानीबद्दल जरूर तो मोबदला देऊन, कोणत्याही प्रकारें मालक कष्टी न होई, अशी तजवीज ठेवावी[3].

मालकाच्या संमतीशिवाय, तारण ठेविलेल्या वस्तूचा जो कोणी उपभोग घेईल[4], त्यानें अशा अपराधाबद्दल

---

१ म. स्मृ. अ. ८ श्लोक १४३.१४४.१४६.

२ आधिश्चोपनिधिश्चोभौ न कालात्ययमर्हतः ।
अवहार्यौ भवेतां तौ दीर्घकालमवस्थितौ ॥ १४५ ॥

३ न भोक्तव्योबलादाधिर्भुंजानो वृद्धिमुत्सृजेत् ।
मूल्येन तोषयेच्चैनमाधिस्तेनोऽन्यथा भवेत् ॥ १४४ ॥

४ यःस्वामिनाऽननुज्ञातमाधिं भुंक्तेऽविचक्षणः ।
तेनार्धवृद्धिर्मोक्तव्या तस्य भोगस्य निष्कृतिः ॥ १५० ॥

( म. स्मृ. अ. ८ )

प्रायश्चित्तादाखल अर्धे व्याज सोडून द्यावें. परंतु, तोच उपभोग मालकाच्या राजीखुषीनें घेतला असल्यास कांहीं हरकत नसून, तेणेंकरून धन्याच्या हक्कासही बाध येत नाहीं.[1]

आपली ठेव ठेवणें असल्यास, शाहाण्या मनुष्यानें ती कुलवान, सदाचरणी, धर्मज्ञ, सत्यवादी, कुटुंबवत्सल, व श्रीमान्, अशा सद्‌गृहस्थाकडे ठेवावी. कारण, अशा सुस्थळीं ठेविल्या कारणानें ती बुडण्याचा संभव नसतो.[2]

ठेव.

जी ठेव ज्या स्थितींत, जशी दिली असेल, तशी घेऊन, ती जशीच्या तशीच परत द्यावी.[3] म्हणजे मोहोरबंद अथवा मुद्राविरहित जशी वस्तु ठेविली असेल, तींत कांहीं एक अफरातफर किंवा बदल करतां कामा नये. तत्संबंधीं यत्किंचित्ही लबाडी केल्यास, किंवा ठेवावयास दिलेला निक्षेप न दिल्यास, राजानें यथान्याय दंड करावा.[4]

---

१ संप्रीत्या भुज्य मानानि न नश्यंति कदाचन ।
धेनुरुष्ट्रो वहन्नश्वो यश्च दम्यः प्रयुज्यते ॥ १४६ ॥

२ कुलजे वृत्तसपन्ने धर्मज्ञे सत्यवादिनि ।
महापक्षे धनिन्यार्ये निक्षेपं निक्षिपेद्बुधः ॥ १७९ ॥

३ यो यथा निक्षिपेद्धस्ते यमर्थं यस्य मानवः ।
स तथैव गृहीतव्यो यथादायस्तथा ग्रहः ॥ १८० ॥

( म. स्मृ. अ. ८ )

४ म. स्मृ. अ. ८ श्लो. १९०।१९१।१९२।१९३।१९४.

मात्र, सदरहू ठेव चोरांनीं हरण केली असेल, किंवा ती जलाशयांत वाहून गेली असेल, अथवा ती अग्नींत दग्ध झाली असेल, तर त्याबद्दलची जबाबदारी ठेव ठेवणाराकडे बिलकुल नाहीं.

## मुदतीचा कायदा.

मुदतीचा कायदा व त्यांचें मूलतत्त्व.

मुदतीच्या कायद्यासंबंधीं, मनुस्मृतींत फक्त दिग्दर्शनच केलेलें दिसतें. तत्संबंधीं विशेष विवेचन कोठेंही केलेलें नाहीं. तथापि, तितक्या पुराणकाळीं देखील, मुदतीसंबंधीं नियमनाचें इंगित, आणि तज्जन्य लाभ, व सोय, हीं व्यवहारज्ञ अशा स्मृतिकारांच्या लक्षांत पूर्णपणें येऊन चुकलीं होतीं. मुदतीच्या निर्बंधानें काम न वाढतां, तें अटोपसर राहतें; आणि वारेमाप व हव्या त्या वेळीं फिर्याद करण्याचा, किंवा काम चालविण्याचा अटकाव होतो. त्यामुळें, कोणताही दावा निष्कारण उपस्थित होत नाहीं; व खटपटीच्या बीजांकुराचेंही निर्मूलन होतें; असें तत्कालीन धर्मशास्त्रकोविद चांगल्या प्रकारें जाणत असल्याचें दिसतें.

मालकाला माहीत असून, अथवा त्याच्या दृष्टीसमोर,

१ चोरैर्हृतं जलेनोढमग्निना दग्धमेव वा ।
न दद्याद्यदि तस्मात्स न संहरति किंचन ॥ १८९ ॥
(म. स्मृ. अ. ८.)

मुदतीची मर्यादा.

जर कोणी एखाद्या वस्तूची वहिवाट सतत दहा वर्षे करील, अथवा सदरहू मुदतीपर्यंत तिचा अविच्छिन्न उपभोग घेईल, आणि तत्संबंधीं मालक यत्किंचितही तजवीज न करितां स्वस्थ बसेल तर, तिचें स्वामित्व त्या वहिवाटदाराकडे किंवा भोगवटेदाराकडे जाऊन, ती मालकास बिलकुल मिळणार नाहीं.

जर कोणी आपल्या अक्कल हुषारींत असतांही, दुसऱ्याला आपल्या वस्तूचा उपभोग करूं देईल, अथवा आपल्या जाणत्या वयांत ह्मणजे सोळा वर्षांचा असतां, तन्निवारणार्थ तो कांहींच प्रतिबंध करणार नाहीं, आणि हें सर्व कृत्य उपभोग घेणाराकडून मालकाच्या डोळ्या देखतच होत असेल, तर मालकाचा तिजवरील हक्क जाऊन, भोगवटा घेणोरास ती वस्तु प्राप्त होईल.

अपवाद, आणि त्यापासून झालेला फायदा.

तथापि, सदरहू नियम खालीं लिहिलेल्या विषयांस बिलकुल लागू नाहींः—

१ यत्किंचिद्दश वर्षाणि संनिधौ प्रेक्षते धनी ।
भुज्यमानं परैस्तूष्णीं न स तल्लब्धुमर्हति ॥ १४७ ॥

२ अजडश्चेदपौगंडो विषये चास्य भुज्यते ।
भग्नं तद्व्यवहारेण भोक्ता तद्द्रव्यमर्हति ॥ १४८ ॥

३ आधिः सीमा बालधनं निक्षेपोपनिधिः स्त्रियः ।
राजस्वं श्रोत्रियस्वं च न भोगेन प्रणश्यति ॥ १४९ ॥

( म. स्मृ. अ. ८ )

१ तारणगहाण. २ ग्रामादि मर्यादा.
३ बालधन. ४ निक्षेप ( ठेव ).
५ दास्यादि स्त्रिया. ६ राजाचें धन;. आणि
७ श्रोत्रियांचें धन.

सबब कोणाही मनुष्याकडे, ह्यांचा भोगवटा दहा वर्षांपेक्षां जास्त मुद्दतपर्यंत असला तथापि, त्यांस मुदतीची हरकत येत नाहीं. आणि उपभोग घेणाराचा अनेक वर्षांचा एकसारखा भोगवटा आहे, येवढ्याच कारणावरून, त्यांजवरील मालकाचें स्वामित्वही दूर होत नाहीं.

आतां, सदरहू अपवादाची खरीच अवश्यकता होती. कारण तो नसता तर, पुष्कळच अन्याय होण्याचा संभव होता. इतकेंच नव्हे तर, नीतिमर्यादेचें उघडपणें उल्लंघन झालें असतें. बालधनाची अगदीं अफरातफर होती. स्त्रियांचें रक्षण व्हावें तसें झालें नसतें. आणि मुदतीच्या मिषानें दुसऱ्याचें अपहरण करण्याची ज्याला त्याला अति निंद्य संवय लागली असती.

# भाग ३४ वा.

## आर्यांचें स्थानिकस्वराज्य.

भरत भूमींतील स्थानिक स्वराज्य, व त्याचें बीज.

ह्या भरतभूमींत, स्थानिकस्वराज्याचें बीज फार प्राचीन काळापासूनच पेरलेलें असून, त्याचीं मुळें बहुत खोल गेलीं असल्या कारणानें, अनेक राज्यक्रांतीच्या प्रचंड झंझावातांत देखील, तीं आज हजारों वर्षें जशींच्या तशींच, व हा काळपर्यंत, सजीव आणि कायम राहिलीं आहेत.

---

1 "The existence of the community has been traced to the earliest times of which history speaks, and even beyond these, when history is lost in the twilight of fable, it can be hazily seen in the mist. So tenacious has it been of life that it has continued almost in its primitive state from those earliest times to the present day. It has proved to be the 'least destructible institution of a society which never willingly surrenders any one of its usages to innovation'. Indeed, it has been the one unchanging, effectual and enduring refuge of man-kind this country, in the midst of changes, the n

( पुढें चालू )

हीं मुळें, काळाच्या अनतत्वांत, व सामाजिक स्थितीच्या परिमाणांत किती दूरवर गेलेलीं आहेत, ह्याचा विचार केला म्हणजे असें सहजींच लक्षांत येतें कीं, **आर्यसंस्थापना** आणि तीं, अगदीं समकालीन आहेत; किंबहुना तीं प्राचीनतम आणि अनादिसिद्धचें आहेत, असें ह्मणण्यासही कांहीं हरकत नाहीं.

त्याचें पुराणत्व.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

violent and fundamental in its Government. Whoever be the masters of the country—and the Hindus, the Pathans, the Mogals, the Mahrathas, and the English have all been masters in turn—the *village communities* remain the same. Thrones may be set up and overthrown, old dynasties may be dissolved and new ones take their place, revolutions the most momentous follow-one-another in rapid and bewildering succession; yet these foundations of rural society remain unchanged, the communities 'bend but break not beneath the storm.' Thus they have continued to exist under all kinds of Government this country has experienced, and according to Maine, the most beneficent systems of Government in India have always been those which have recognised it as the basis of administration."

(Times of India, 18/6/91).

1 "The late Mr. Chisolm Anstey, a man of immense erudition, once pointed out at a meeting

( पुढें चालू )

आतां, ह्या स्थानिक स्वराज्याचा जरठ वृक्ष कसा उदयास आला; आणि त्याच्या पारंब्या व मुळें, हीं कोणकोणत्या कारणांनीं कशा प्रकारें दूरवर गेलीं, या विषयीं विचार करूं.

आर्यांची वस्ती जसजशी वाढत गेली, तसतसे ते या

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

of the East India Association in London, that 'we are apt to forget in this country when we talk of preparing people in the East by education and all that sort of thing, for Municipal Government, and Parliamentary Government, that the East is the parent of Municipalities. Local Self Goverment in the widest acceptation of the term, is as old as the East itself. No matter what may be the religion of the people who inhabit what we call the East, there is not a portion of the country from west to east, from north to south, which is not swarming with municipalities; and not only so, but like to our municipalities of old, they are all bound together as in a species of net-work, so that you have ready made to your hand, the frame-work of a great system of representation."

"The East is certainly full of fragments of ancient society. Of these, the most instructive, because the most open to sustained observation, are to be found in India.''

(Maines' Village-communities. P. 13)

( पुढें चालू )

जीवनकलह, व त्याचीं मूलतत्त्वें.

भरतखंडांत चोहोंकडे पसरले. त्यावेळीं, ह्या जीवनकलहाच्या संबंधानें ज्या मुख्य आणि विशेष महत्वाच्या गोष्टी, याविषयीं प्रथमतः तजवीज करणें भाग पडलें. आतां, ह्या महत्वाच्या गोष्टी ह्मटल्या ह्मणजे १ उदरपोषण, आणि २ स्वसंरक्षण होत. तेव्हां, तत्संबंधीं जरूर ती तजवीज करण्यासाठीं, आर्यांनीं उपलब्ध असलेल्या चांगल्या जमीनींचे प्रथम विभाग केले. त्यापैकीं, पाहिल्या अवश्यकतेची ह्मणजे उदरपोषणाची पूर्तता होण्यास्तव, प्रत्येकाच्या जरूरीप्रमाणें, ज्याला त्याला जमीन दिली; किंवा ती त्यांनीं, आपापल्या गरजेप्रमाणें, आपापसांत वांटून घेतली; आणि बाकी राहिलेल्या दुसऱ्या गरजेचा ह्मणजे स्वसंरक्षणाचा कार्यभाग व्हावा एतदर्थ, कांहीं जमीन अगदींच स्वतंत्र व अलग अशी तोडून ठेविली. त्या योगानें, अन्नाच्छादनाची सोय निर्वेधपणें होऊन, परित्राणाविषयींची-व्यक्तिचिंता अजिबात कमी झाली.

१ उदरपोषणाची प्रथमतःच तजवीज झाल्याकारणानें,

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

"Of one thing there is no doubt ; knowledge must have accompanied the tide of migration from the east: and from higher Asia emerged the Asi, the Catti, and the Cembric Lombard, who spread the system in Scandinavia, Friesland, and Italy."

(Tod's Rájasthan P. 118).

उदरपोषण, स्वसंरक्षण, व स्वावलंबन.

आर्यकुटुंबाचें समग्र लक्ष २ स्वसंरक्षणाकडे साहजकिच लागलें असावें. आणि त्यावेळच्या स्थितिमानाप्रमाणें, तत्संबंधीं योग्य तो बंदोबस्त झाल्यानंतर, अधिनिवास करून राहिलेल्या तत्कालीन समाजाचें लक्ष्य, आपणांस ३ स्वावलंबी करण्याकडे लौकरच वेधलें जाऊन, त्याविषयीं त्यानीं हरएक प्रयत्न केला; व त्यांच्या प्रथमावस्थेतील गरजांच्या मानानें तो सफलही झाला.

१ जीवसंरक्षणार्थ अन्न; २ स्वसंरक्षणार्थ वीरपुत्र; आणि ३ परावलंबी राहण्याची अवश्यकता पडूं नये एतदर्थ धन, व गुरांढोरांची विपुल संपत्ति; इत्यादि मुख्य गोष्टी, आमच्या आर्य–पूर्वजांनीं आपल्या अधिदेवतेजवळ[1] मागितल्याचीं उदाहरणें, ऋग्वेद[2] भांडारांत, पुष्कळ ठिकाणीं सांपडतात.

---

१ ही अधिदेवता इंद्र होय.

**२ समिन्द्र राया समिषा रभेमहि सं वाजेभिः पुरुश्चन्द्रैरभिद्युभिः । संदेव्या प्रमत्या वीरशुष्मया गोअग्रया श्वावत्या रभेमहि ॥ ५ ॥ १५ ॥**

‘हे इन्द्रा, अशी कृपा कर कीं जेणेंकरून आह्मीं अन्नसंपन्न, आणि संपत्तिमान् होऊं. आह्मांस सुंदर व आल्हादकारक असे घोडे दे. तसेंच आह्मांस वीर पुत्र व प्रतापशील संतति दे; आणि अश्वगोधनांनीं आह्मांस श्रेष्ठ व संपन्न कर.’ असा ह्या मंत्राचा भावार्थ आहे.

( अ. १ अ. ४ व १५. म. १ अ. १० सू. ५३ )

एतावता, स्थानिकस्वराज्याच्या बीजारोपणाविषयींचे मूलसिद्धांत पाहूं गेले असतां, त्याचे मुख्यत्वेंकरून तीन घटकावयव दृष्टिगोचर होतात; आणि ते १ स्वपोषण, २ स्वसंरक्षण, व ३ स्वावलंबन, हे होत. हे घटकावयव परस्परांत अतिसूक्ष्म जालानें गुंफले जाऊन, ते इतके संमिश्रित झाले आहेत कीं, एकाचा विचार केला ह्मणजे दुसऱ्याचा विचार करणें साहजीकच भाग पडतें; आणि म्हणूनच त्या प्रत्येकाविषयीं साद्यंत व क्रमशः विवेचन करणें अगदीं अवश्य, आणि अगत्याचें असतें. सबब तत्संबंधीं थोडी हकीकत देतों. कारण, तसें केल्यानेंच आमच्या **ग्रामसंस्थांचें**, व **भारतीय** स्वराज्याचें, खरें व मूलस्वरूप ध्यानांत येण्यासारखें आहे.

स्वपोषणाविषयींची तजवीज.

१ स्वपोषणाची तजवीज विशेष प्रयास न पडतां व्हावी एतदर्थ, अधिनिवासित—स्थानाच्या अजूबाजूची भूमि, आणि भोंवतालचा प्रदेश, इत्यादिकांची अनुकूलता मनांत आणूनच, तेथें **आर्यांनीं** वास्तव्य केलें. राहण्यासाठीं निर्वेध व कोरडी जागा; पिण्याकरितां नजीक व आसपास पाणी; हवें तें पिक तयार करण्यासाठीं सुपीक जमीन; उत्तम शेतें होण्यासाठीं चांगली खलाटी; गुरांची चरण्यांची सोय होण्याकरितां सपाट माळ; जाळण्यासाठीं सर्पण हवें ह्मणून समीपस्थ जंगल; अथवा थंडीपासून

निवारण व्हावें एतदर्थ झगरी करितां फाटी, किंवा शेकुटी-साठीं लांकडांचे ओंडे, वगैरे बिन हरकत उपलब्ध व्हावे ह्मणून, नजीकसा एकादा डोंगर; इत्यादि अनेक सोई पाहूनच ठिकठिकाणीं वसाहती झाल्या.

ह्या वसाहतींतील लोकसंख्या दिवसानुदिवस अधिकाधिकच वाढत चालल्यामुळें, उत्पन्न होणाऱ्या जास्त प्रजेच्या संगोपनार्थ, कांहीं फालतु पड जमीन, आणि गवताचे माळ, अगदीं अलग ठेवून, लोकांच्या गरजेप्रमाणें त्यांतूनच, प्रसंगानुसार, ज्याला त्याला जमीन वांटून देण्यांत येई.

सदरहू नूतन समाजाच्या प्रथमावस्थेंत, सर्वांचे आहार आणि विहार बहुतकरून एकत्रच होत असत. त्यांचें राहणेंही एके ठिकाणींच असून, त्यांचीं गुरें देखील एकत्रच चरत. त्यामुळें शेतकी व नांगरकी, हीं बहूत करून सर्वांमिळून एकत्रच होऊन, पीक पिकल्यावर तें एके ठिकाणीं सांठवून ठेवण्यांत येई; अथवा त्याच्या उडव्या रचून ठेवीत; किंवा तें सर्वानुमतें वांटून घेत. परंतु कालांतरानें हा समाज जसजसा मोठा होत चालला, व एकंदर कुटुंब फैलावत गेलें, तसतसें प्रत्येकाच्या प्रपंचाची अगदीं निराळीच तजवीज करणें विशेष सोइस्कर वाटूं लागलें. त्या कारणानें त्यांनीं भूमीचे विभाग करून, प्रत्येक कुटुंबाच्या

1 "The whole face of India is parcelled out into

( पुढें चालू )

जरूरीप्रमाणें जमीन व शेतें, माळ व रानें, आणि गुरें व ढोरें, हीं वांटून घेतलीं; व त्यायोगानें प्रत्येकाच्या चरितार्थाची पंचाईत दूर झाली.

स्वसंरक्षणार्थ बंदोबस्त.

२ अशा प्रकारें उदरनिर्वाहाची सोय झाल्यानंतर, अनार्य, रानटी, स्वेच्छाचारी, आणि निर्मर्याद लोकांच्या उपद्रवापासून आपल्या शरीराचें व मालमत्तेचें योग्य संरक्षण करण्याचा बोजा, त्या समाजावर अनुक्रमानेंच पडला. तेव्हां, तत्संबंधीं बंदोबस्ताची, व चांगली योजना होण्यासाठीं, त्यांस लौकरच विचार करावा लागला; व ही योजना करतांना, प्रत्येक कुटुंबानें आपल्यांतला एक एक पुढारी इसम दिला. हा बहुतकरून वृद्ध व वजनदार, तसेंच जाणता व पोक्त असल्यामुळें, कुटुंबाचें नियंतृत्व त्याच्याकडेसच असे. आणि त्याच कारणानें त्याच्या हातांत बरीच सत्ता देखील राही. अशा स्थितींत,

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )
estates of villages. The village communities are composed of those who hold and cultivate the land, the established village-servants, priest, black-smith, carpenter, accountant, washerman (whose wife is ex. officio the midwife of the little village community), potter, watchman, barber, shoemaker &c. ".

(Rambles of an Indian official by Colonel Sleeman. vol. I. chapter X.)

एकंदर समाजाची रचना आणि सरणी, सर्वांस सोइस्कर व फायदेशीर होई अशी तजवीज ठेवून, बाह्योपद्रवापासून संरक्षण व्हावें एतदर्थ, हे कुटुंब-प्रतिनिधि एकत्र जमले. व त्यांनीं सर्वानुमतें जिकडे जशी जरूर असेल त्याप्रमाणें प्रत्येक गांवीं, किंवा अनेक गांवांमिळून एका मोठ्या कसब्यांत, थोडी बहूत शिबंदी ठेवून, कांहीं व्यवस्था अमलांतहीं आणिल्या. तदनंतर समाजबंधन, धर्मबंधन, आणि राजबंधन, इत्यादि कारणांनीं सदरहू व्यवस्था, व संस्था, दिवसानुदिवस विस्तृत होत जाऊन, **मनुस्मृतीच्या** कालांत तर त्या चांगल्या विकासाप्रत पावल्या. ह्या संस्था इतक्या महत्वाच्या आहेत कीं **हिंदु साम्राज्याचा** तो पायाच ह्मटलें तरी चालेल. सबब त्यांचें दिग्दर्शन चांगल्या रीतीनें होण्यासाठीं, तत्संबंधीं विवेचन आपण मुळापासूनच करूं.

स्वरक्षणाच्या संबंधानें, वेदकालीन स्थिति.

**वेद** कालीं, ह्मणजे आज सुमारें बारा १२ हजार वर्षांमागें, एकंदर समाजाची स्थिति किती गडबडीची आणि धामधुमीची असावी, हें सहजींच लक्षांत येण्यासारखें आहे. सर्वत्र जंगल, आणि

---

१ तारीख ५ सप्टेंबर सन १८९२ रोजीं, सर्व जगास महशूर अशी प्राच्य परिषद् लंडन् विद्यापीठांत झाली. त्यावेळीं प्रोफेसर मोक्षमुलरनीं अध्यक्षस्थान स्वीकारून, जें सुप्रसिद्ध भाषण केलें, त्यांतच वेदकालाविषयीं सामान्य उल्लेख आहे. आणि त्याअन्वयें, वेदकाळ सुरू झाल्याला बारा हजार वर्षें होऊन गेलीं असल्याचें दिसतें.

चोहोंकडे **अनार्य** लोकांची वस्ती, व **भील, कोळी, कातकरी,** वगैरे वनचरांचा सुळसुळाट असल्यामुळें, एकंदर प्रदेशांत विशेष भिति असे. ह्या रानटी लोकांपासून **आर्य** लोकांस वारंवार उपद्रव होई, आणि ते ह्यांजवर नेहेमीं हल्ले करीत. तेणेंकरून जीवाचा बचाव करण्यास फार कठीण जाई; मालमत्तेचा सांभाळ होण्यास बहुत अडचण येई; आणि यज्ञयागादि धर्मक्रिया आचरण्यास विशेष पंचाईत पडे. त्या कारणानें, प्रत्येकावर स्वसंरक्षणाचा बोजा अतिशयच पडला जाऊन, दर एकास तत्संबंधीं अहोरात्र काळजी बाळगावी लागे. इतकेंच नाहीं तर, त्या कामीं आपणांस यश यावें ह्मणून ते डोळ्यांत तेल घालून रात्रंदिवस झटत; मनःपूर्वक एकसारखा पाहरा करीत; आणि **परमेश्वरास**[१] अनन्यभावें शरण जाऊन, त्याचें साहाय्य मागत.

" हे पूजनीय **अग्ने,** आमचें संरक्षण करून आमच्या यज्ञयागादि क्रिया निर्विघ्नपणें तडीस ने; कारण तूं आमचा, आमच्या मुलांबाळांचा, आणि गुरांढोरांचा रक्षण करणारा आहेस," इत्यादि अर्थाची ऋचा **ऋग्वेदांतील**

१ हा परमेश्वर म्हटला ह्मणजे अग्नि देवता होय. वेदांत निरनिराळ्या देवता भिन्नभिन्न वेळीं, केवळ परमेश्वराप्रमाणेंच सर्व शक्तिमान मानल्या जात असत, असें ऋग्वेदावलोकनावरून चांगलें लक्षांत येईल.

पहिल्या **मंडळांत** आढळते; व त्यावरून तत्कालीन खरी स्थिति कशी असावी हें चांगलें लक्षांत येतें.

अनार्य लोकांचा बंडावा.

पूर्वी उल्लेख केलेले **अनार्य** लोक ह्मटले ह्मणजे **दस्यु, नैचाशाख, निषाद, किरात,** ( कातकरी, कोळी, भिल्ल, खोंड, महार, ) वगैरे होत. हे वनांत फिरणारे, व जंगलांत राहणारे असून, कर्महीन आणि अव्रत असत.

---

**१ त्वं नो अग्ने तव देव पायुभिर्मघोनोरक्ष तन्वश्च वन्द्य । त्राता तोकस्य तनये गवामस्य निमेषं रक्षमाणस्तव व्रते ॥ १२ ॥**

( मं. १. अ. ७. सू. ३१ )

ह्याच्याच पुढील ऋचेंत असें ह्मटलें आहे कीं, "हे अग्ने, तूं रक्षणहीन उपासकांच्या हितासाठीं पेटविला जातोस". ( १३ ). त्यावरून, त्यावेळेस आर्यांजवळ परित्राणाचें चांगलेंसें साधन नव्हतें, असें दिसतें.

२ रानांत, आणि जंगलांत असलेल्या खोपटांत, दस्यु सारख्या अनार्यांस पराभव करून पळवून लाविल्याविषयीं श्रुति आहे.

**अहन्निन्द्रो अदहदग्निरिंदो पुरा दस्यून्मध्यन्दिनादभीके । दुर्गे दुरोणे क्रत्वा न यातां पुरू सहस्रा शर्वा निबर्हीत् ॥ ३ ॥**

( अ. ३ अ. ६. व १७. मं. ४. अ. ३ सू. २८-३२४ )

१

त्यामुळें, त्यांचा व्यवहार आणि आचरण हीं आर्यांस अगदींच पसंत व संमत नसत. सबब त्यांस जिंकून, त्या सर्वांस आपल्या ताब्यांत आणि अमलाखालीं आणण्या-विषयीं, ते हरएक प्रकारचा प्रयत्न करीत; व कीकटादि[2] अनार्य प्रदेश आपल्या अधिकाराखालीं येऊन, नैचाशा-

---

१ विजानीह्यार्यान्ये च दस्यवो बर्हिष्मते रंधया शासदव्रतान् । शाकी भव यजमानस्य चोदिता विश्वेत्ताते सधमादेषुचाकन ॥८॥

( मं १. अ १०. सू ५१ )

ह्या ऋचेंत, आर्य कोण, व दस्यु कोण, हें पूर्णपणें लक्षांत आणून, सर्वांस एक सारिखें न मानितां, पहिल्यांचें रक्षण आणि दुसऱ्यांचा संहार करण्या विषयीं, आर्यांनीं इंद्राची प्रार्थना केली आहे. तसेंच त्या कर्महीन दस्यूंचें शासन करून, त्यांस आपल्या हस्तगत करण्या बद्दलही त्याचें स्तवन केलें आहे.

ज्या प्रमाणें अनार्य लोकांस दस्यु, कर्महीन, अव्रत, इत्यादि विशेषणें लाविलेलीं वेदांत आढळतात, त्याच प्रमाणें आर्यांस बर्हिष्मत्, सुन्वत्, देवयु, यज्वन्, ( ह्मणजे यज्ञ करणारे, सोमकाढणारे, देवांची वांछा पूर्ण करणारे,यजन करणारे), वगैरे विशेषणें दिलेलीं असल्याचें दिसून येतें.

२ ' कीकट ' ह्मणजे ' अनार्य देश ' असें सायणाचार्य म्हणतात. सुप्रसिद्ध व सर्वमान्य शंकराचार्यांनीं समाधि घेतलेला देश हाच असून, त्यांच्या समाधीचें ठिकाण वसईच्या उत्तरेला निर्मळ गांवीं आहे. तेथें तन्निमित्त अजून देखील दर कार्तिक वद्य १०, ११, १२, ला यात्रा भरते.

खादि **अनार्य** लोकांवर आपला पगडा बसावा, एतदर्थ ते इंद्रादि आराध्य देवतांस अनन्यभावें शरणही जात.

अशा प्रकारें **अनार्य** लोकांपासून आपणांस उपद्रव होऊं नये, व ते पूर्णपणें आपल्या कबजांत यावे, एतदर्थ आमचे **आर्य**—पूर्वज हळूं हळूं त्याच तजविजीस लागले. प्रथमतः, त्यांस साहजीकच असें वाटलें कीं, जवान, बलवान, आणि शूर[२] पुरुषाशिवाय, परकीयांच्या हल्ल्या-

---

१ किं ते कृण्वंति कीकटेषु गावो नाशिरं दुह्रे न तपंति धर्मम् । आनो भर प्रमगंदस्य वेदो नैचाशाखं मघवन्रंधयानः ॥ १४ ॥

(अ. ३ अ. ३. व २१. म=३. अ ४. सू. ५३–२८७.)

ह्या मंत्राचा भावार्थ इतकाच आहे कीं, कीकट देशांत अनार्यांचीच वस्ती असल्या कारणानें, त्यापासून आपणांस यत्किंचितही उपयोग होत नाहीं; सबब तो पराजित करून, त्यांतील नैचाशाखादि अनार्यांस आपले अंकित बनवावे; व ह्या कार्यभाग साधण्यासाठींच इंद्राला अनुलक्षून ह्यींचें स्तवन आहे.

२ समिन्द्र राया समिषा रभेमहि सं वाजेभिः पुरुश्चन्द्रैरभिद्युभिः । संदेव्या प्रमत्या वीर शुष्मया गो अग्रयाश्वावत्या रभेमहि ॥५॥१५॥

( अ. १ अ. ४ व १९. मं. १ अ. १० सू. ५३ )

( पुढें चालू )

पासून स्वसंरक्षणाचें काम निर्विघ्नपणें कधींही पार पडणार नाहीं. तसेंच अश्वरथादि युद्धसामग्रीशिवाय, केवळ योद्ध्यांनींच कांहीं देखील कार्यभाग होणार नाहीं. ही गोष्ट मनांत येऊन, त्यांनीं आपल्यांपैकीं अगदीं निवडक निवडक अशा लोकांची लहानशी शिबंदी तयार केली; आणि तिजबरोबर उपलब्ध असलेली सामग्री देऊन, ती ठिकठिकाणीं जरूरीप्रमाणें पाठविली.

ह्या व्यवस्थेनें त्यांस लौकरच यश आल्यासारिखें दिसतें.

अनार्यांची वशता.

कारण, शत्रूंचे किल्ले सर करून त्यांचीं नगरें उध्वस्त केल्याविषयीं ठिकठिकाणीं वारंवार उल्लेख केल्याचें ऋग्वेदांत आढळतें.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

या मंत्रांत, वीर पुत्र आणि पराक्रमी संतति प्राप्त होई असा वरप्रसाद दे, म्हणून जी इंद्राची प्रार्थना केली आहे, तिचें इंगित व बीज हेंच असावें. कारण, कोणत्याही देशाची मुख्य दौलत म्हटली म्हणजे, शूर पुत्रच असल्यामुळें, त्याविषयींचें मागणें आर्यांनीं प्रथम करून, तदनंतर अश्वगवादि संपत्ति मागितली.

१ त्वमाविथ नर्यं तुर्वशं यदुं त्वं तुर्वीतिं वय्यं शतक्रतो। त्वं रथमेतशं कृत्व्ये धने त्वं पुरो नवतिं दंभयो नव ॥ ६ ॥

( अ. १. अ. ४. व. १८. म. १. अ. १०. सू. ५४ )

ह्या मंत्रांत तुर्वश, यदु, तुर्वीति, वय्य, इत्यादि उपासकांचें देवतांनीं

( पुढें चालू )

दुसऱ्या एका मंत्रांत तर शत्रूंचे वीस राजे, आणि त्यांचें साठ हजार नव्याण्णव सैन्य मारून टाकिल्याविषयीं उल्लेख आहे. तसेंच, नव्याण्णव नगरें फोडून विध्वस्त केल्याविषयीं तर, बहुत ठिकाणीं वर्णन आहे. याप्रमाणें शत्रूंचा वारंवार पराभव होऊन, त्यांस "देमाय धरणी ठाय" असें झालें; व त्यामुळें आर्यांस शरण जाणें त्यांस अगदीं भागच पडलें.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

रक्षण करून, शत्रूंचीं नव्याण्णव ह्मणजे असंख्य अथवा अपरिमित नगरें फोडून टाकिल्याविषयीं दिग्दर्शन आहे.

१ त्वमेतां जनराज्ञो द्विर्दशाबंधुना सुश्रवसोप-
जग्मुषः । षष्टिं सहस्रा नवतिं नव श्रुतो
नि चक्रेण रथ्या दुष्पदावृणक् ॥ ९ ॥

( अ. १. अ. ४. व. १६. मं. १. अ. १० सू. ५३ )

२ ऋग्वेद २. १९. ६; ( नवतिं च नव इन्द्रः पुरः वि ऐरयत् शंबरस्य. )

,, ७. १९. ५; ( तानि नवयत् पुरो नवतिं च सद्यः )

,, ८. ९३. २; ( नवयो नवतिं पुरो विभेद बाह्वोजसा अहिं च वृत्रहावधीत् ).

,, ३. १२. ६; ( इन्द्राग्नी नवतिं पुरो दासपत्नीः अधूनुतम् ). हे इन्द्राग्नी, तुम्ही दासांचीं म्हणजे अनार्य शत्रूंचीं नव्वद नगरें हालवून दिलींत, असा ह्याचा भावार्थ होय.

तद्नंतर कालांतरानें, **आर्यावर्तांतील** गडबड, आणि **अनार्यांचा** धुडावा, बऱ्याच अंशानें मोडून, हळूं हळूं सर्वत्र शांतता होत चालली. **आर्यांचा** ठिकठिकाणीं चांगला अम्मल बसला, व रानटी लोक त्यांच्या पूर्णपणें कबजांत आले. त्यामुळें, आमच्या पूर्वजांस हरएक बाबतींत व्यवस्था करण्यास उत्तम संधी सांपडली.

काबिज केलेल्या प्रांतांतील शांतता व बंदोबस्त.

चोहोंकडे निर्वेधता प्राप्त झाल्यानंतर, प्रथमतः मुख्य तजवीज करावयाची ह्मटली ह्मणजे, दंग्याधोप्यापासून देशाचें निरंतरचें संरक्षण, व राष्ट्रांतील सर्व प्रकारचा बंदोबस्त होय. आणि एतदर्थच, तत्कालीन स्थितीप्रमाणें आमच्या पूर्वजांनीं चांगली दूर दृष्टी पोहोंचविली, व पुष्कळ सुधारणा केली. त्यांनीं ज्या मार्गाचें अवलंबन केलें, त्याप्रमाणें सर्व व्यवस्था त्यांनीं अमलांत आणिल्या. आणि **मनुस्मृतीवरून**, व सांप्रतच्या **ग्रामसंस्थांवरून**, तसें पूर्णपणें व्यक्तही होतें.

ग्रामाधिपतींची योजना.

देशस्थिति व लोकस्थितीप्रमाणें, जेथें अशी जरूर वाटली त्या मानानें[१] दोन, किंवा तीन, अथवा पांच गांवामिळून, कांहीं शिबंदी ठेविली. आणि ज्याठिकाणीं

---

१ द्वयोस्त्रयाणां पंचानां मध्ये गुल्ममधिष्ठितम् ।
तथा ग्रामशतानां च कुर्याद्राष्ट्रस्य संग्रहम् ॥ ११४ ॥
( म. स्मृ. अ. ७ )

कमी जरूर दिसली; तेथें शंभर गांवांमिळून एक रक्षा-स्थान केलें, व लष्करी ठाणे बसविलें. तदनंतर मुलकी, दिवाणी, आणि फौजदारी कामासंबंधीं अंतःस्थितीचा बंदोबस्त राहण्यासाठीं, ग्रामाधिपतींची[१] योजना केली. ती अशी कीं, प्रत्येक गांवाला एकएक अम्मलदार देऊन, त्यांजवर चांगली देखरेख राहण्यासाठीं, दहा गांवामिळून एक वरिष्ठ कामगार ठेविला. कोठेंकोठें अशा कामगारांच्या ताब्यांत वीस, तीस, अथवा चाळीस गांव, किंवा त्यापेक्षांही न्यूनाधिक संख्या दिली. क्वचित् ठिकाणीं, शंभर गांवांची सत्ता त्यांजकडे सोंपविली. आणि विशेष प्रसंगीं तर एक हजार गांवांचें आधिपत्य त्यांजला देऊन, महत्त्वाचे अधि-कार बजाविण्याविषयींही त्यांस फर्माविलें. तसेंच, कामा-च्या स्वरूपाप्रमाणें, अव्वलपासून अखेरपर्यंत त्याचीं तोडजोड लाऊन, एकंदर सर्व व्यवस्था केली; व शेंवटल्या कामगारानें आपल्या अधिकारांतलें तेवढेंच काम करून, अवशिष्ट काम खालच्या अम्मलदारांनीं, अधिकारानुरूप, वरिष्ठ ठिकाणीं आपापल्या पाहिरीप्रमाणें निवेदन करावें, असें नियमांत आणिलें.[२]

---

१ ग्रामस्याधिपतिं कुर्याद्दश ग्रामपतिं तथा ।
विंशतीशं शतेशं च सहस्रपतिमेव च ।। ११५ ।।
( म. स्मृ. अ. ७. )

२ ग्रामदोषान्समुत्पन्नान् ग्रामिकः शनकैः स्वयम् ।
शंसेद्ग्रामशतेशाय दशेशो विंशतीशिनम् ।। ११६ ।।

( पुढें चालू )

नगराधिपति व त्यांचें काम.

याप्रमाणें, ग्रामसंरक्षणाची तजवीज झाल्यावर, नगररक्षा म्हणजे मोठमोठ्या शहरांचा बंदोबस्त रहाण्यासाठीं, नगराधिपतींची[1] योजना केली. ह्यांजकडे मुख्य कामें म्हटलीं म्हणजे शहरची सर्व प्रकारची व्यवस्था राखणें; आणि अखिल ग्रामाधिपतींवर देखरेख ठेवणें; हीं होत. याशिवाय; प्रजाजनाची वेळेवेळीं योग्य दाद घेणें, लोककल्याणार्थ झटणें, रयतेचें संगोपन करणें, इत्यादिकांविषयीं पूर्ण दक्षता ठेवून; एकंदर राष्ट्रांत कोणत्या प्रकारची, कशी; आणि काय कारणानें हालचाल चालली आहे; हेंही[2] त्यांस लक्षपूर्वक पहावें लागत असे.

देशाची संरक्षा.

ह्या व्यवस्थेनें देशाचा एकंदर बंदोबस्त चांगला राहिला. खेड्यापाड्यांतील लोकांस स्वस्थता प्राप्त झाली. आणि लहानमोठ्या शहरांतील भीति अजिबात नाहींशी होत

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

विंशतीशस्तु तत्सर्वं शतेशाय निवेदयेत् ।
शंसेद्ग्रामशतेशस्तु सहस्रपतये स्वयम् ॥ ११७ ॥

१ नगरे नगरे चैकं कुर्यात्सर्वार्थचिन्तकम् ।
उच्चैः स्थानं घोररूपं नक्षत्राणामिव ग्रहम् ॥ १२१ ॥

२ स ताननु परिक्रामेत्सर्वानेव सदा स्वयम् ।
तेषां वृत्तं परिणयेत् सम्यग्राष्ट्रेषु तच्चरैः ॥ १२२ ॥

( म. स्मृ. अ. ७ )

चालली. इतकेंच नव्हे तर, शांततेच्या योगानें वस्ती वाढली; आणि त्यामुळें क्षुद्रग्रामसमुदायाचीं विशाळ नगरें बनलीं; व लहान लहान गांवांचीं शहरें झालीं. जो तो आपआपल्या कामधंद्यास निर्विघ्नपणें लागला; व दिवसानुदिवस, सुखोपभोगाचीं साधनें पाहण्याकडे ज्याचें त्याचें लक्ष्य वेधलें. कोणासही निष्कारण उपद्रव होतनासा झाला; आणि प्रत्येकास आपल्या श्रमाचें फल मिळत चाललें. चोरादि तस्करांस शासनाची भीति राहिली; व क्रूर स्वभावाचे जंगली लोक कमी होत गेले. विद्येचा प्रसार हळू हळू होत चालला; आणि त्यामुळें विचारशीलतेचें पाऊल पुष्कळच पुढें सरसावलें.

स्वावलंबन.

३ अशा प्रकारची महत्वाची व्यवस्था, तसेंच मुख्यत्वेंकरून स्वपोषणाची आणि स्वरक्षणाची तजवीज, आमच्या पूर्वजांनीं आपण होऊनच योग्य वेळीं केली. व त्याचा स्वाभाविक परिणाम असा घडून आला कीं, प्रत्येकाला स्वतःचें अवसान कळून येऊन, स्वावलंबनाची आपोआपच संवय लागली. एकंदर समाजाला परावलंबनाची अवश्यकताच राहूं नये, अशी तजवीज जो तो पाहूं लागला. दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्याचें त्यांस आवडेनासें झालें. आणि स्वातंत्र्यदेवीनें आपलें खरें स्वरूप प्रकट केल्यामुळें, तिच्या प्रभावाचें प्रतिबिंब चोहोंकडे फांकलें. ज्य

त्याला तिच्या तेजांतच काम करण्याची इच्छा उत्पन्न झाली. आणि स्वातंत्र्यदेवतेचे सर्वच पूर्ण उपासक बनले.

ग्रामभृत, किंवा गांव नोकर.

भारतीय साम्राज्यांत, गांवचे मुख्य नोकर अथवा ग्रामभृत म्हटले ह्मणजे खालीं लिहिल्याप्रमाणें होतः—

१ **ग्रामाधिपति.** ह्यालाच सांप्रत पाटील, मुकादम, आणि मांदील, अशी संज्ञा अनुक्रमें दक्षिणेंत व बंगाल्यांत आहे. क्वचित् ठिकाणीं, विशेष अधिकारानुरूप, त्याला सरपाटील व कारभारी, असेंही म्हणतात.

२ **ग्रामलेखक.** ह्याला उत्तर हिंदुस्थानांत पटवारी, दक्षिणेंत कुळकर्णी, आणि मद्रासेकडे कर्णम्, असें ह्मणतात. कमी जास्ती अधिकारानुरूप, व कामाच्या योग्यतेप्रमाणें, त्यालाच सरदेशमुख, देशाधिकारी, देशमुख, देशपांडे, देशलेखक, देसाई, चौधरी, कानोंगो, सरखोत, तलाटी, आणि जमीनदार, अशी हल्लीं संज्ञा आहे.

३ **ग्रामयाजक.** ह्याला सांप्रत गुरव म्हणतात.

४ **ग्रामज्योतिष.** ह्मणजे गांव जोशी.

५ **ग्रामकर्मार.** ( गांवलोहार. )

६ **ग्रामतक्ष.** ( गांवसुतार ).

७ **ग्रामकुलाल.** ( गांवकुंभार ).

८ **ग्रामरजक.** ( गांवधोबी ).

९ **ग्रामनापित.** ( गांवन्हावी ).

१० **ग्रामपाल.** ( गांवजागल्या ).

११ **ग्रामवैतालिक.** ( गांवभाट ).

१२ **ग्रामगोदुह.** ( गांवगौळी ).

१३ **ग्रामघातिन्.** ( गांवखाटिक ).

१४ **ग्रामप्रेष्य.** ( गांवमहार ); ( धेड, व वेठ्या ). आणि हाच गांवचा वाटाड्या, ह्मणजे वाट दाखविणारा होय.

१५ **ग्रामघोषिन्.** (दवंडी पिटणारा, ) व

१६ **ग्रामचर्मकार.** ( गांवचांभार ).

अर्वाचीनकाळीं, याशिवायही आणखी दुसरें गांवकामगार दृष्टीस पडतात, व ते खालीं लिहिल्याप्रमाणें होत:—

१७ **पोतदार.** ( गांवसोनार ).

१८ **शिंपी.** ( गांवचें शिवणकाम करणारा ).

१९ **तांबोळी.** ( विड्याचीं पानें, सुपारी, तमाखु, इत्यादि विकणारा ).

२० **गवंडी.** ( गांवचीं घरें बांधणारा ).

२१ **तेली.** ( तेल विकणारा ).

२२ **कासार.** ( कल्हई, व डाक लावणारा ).

२३ **बुरुड.** ( सुपें, टोपल्या, इत्यादि विकणारा ).

२४ **वाजंत्री.** ( वाद्यें वाजविणारा. हाच क्वचित ठिकाणीं पत्रावळी व द्रोणही लावतो ).

२५ **मशालजी.** ( मशाल नेणारा, व दिवाबत्ती करणारा ).

२६ **शिंगाड्या.** ( शिंग फुंकणारा ).

२७ **मढवी.** (झाडसारवण करून, भांडीं घांसणारा).

२८ **वेठ्या.** ( बोजा उचलणारा ).

२९ **मुलना.** (कुराण, व मुसलमानीधर्म पढवणारा).

३० **बागवान.** ( गांवमाळी ).

३१ **टाणगा.** ( हा गांवचें किरकोळ काम करितो; गांवच्या तिजोरीबरोबर असतो; व वाटही दाखवितो. हा गांवचा चपराशीच होय ).

३२ **मांग.** ( हा फांशीं देणें असल्यास फांस चढवितो, आणि शिंकीं वगैरे करतो ).

ग्रामरचना, व तिचें प्राचीन आणि अर्वाचीन स्वरूप.

सदरहू ग्रामरचनेवरून, एकंदर **भारतीय** समाजसंस्था सहजीं लक्षांत येण्यासारखी आहे. आणि अशा प्रकारची ग्रामरचना, व तत्संबंधीं स्थानिक स्वराज्य, हीं **भरतखंडांत** अजूनपर्यंत देखील थोडीबहुत अमलांत

---

1 "Traces of the revenue divisions of Manu, under lords of ten towns, lords of hundred, and lords of thousand towns, are still to be found, especially

( पुढें चालू )

आहेत. गांव, कसबे, आणि परगणे, हे आजमितीसही पूर्व स्थितींत दृष्टीस पडतात; व त्या त्या ठिकाणचे पूर्वींचे कामगार देखील, आपापलीं कामें पूर्वपद्धतीस अनुसरून, हल्लींही बजावितात. प्रत्येक गांव, कसबा, किंवा परगणा, हीं एकच प्रमाणाचीं नसून, लोकवस्तीच्या आणि समाजस्थितीच्या मानानें, तीं कमी जास्ती असतात. प्रत्येकाची सीमा ठाम केलेली असून, तिचें संगोपन होण्याविषयीं चांगली दक्षता ठेविली जाते. प्रत्येक गांवाला स्वसंरक्षणार्थ बहुतकरून तटबंदी केलेली

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

in the Deckan ; but the only one which remains entire is that called Pergana, which answers to the lordship of 100 towns. Even the officers of the old system are still kept up in those divisions, and receive a remuneration in lands and fees ; but they are no longer the active agents of the Government and are only employed to keep the records of all matters connected with land." * * * *

"But among all these changes, the townships remain entire, and are the indestructible atoms, from an aggregate of which the most extensive Indian empires are composed."

(Elphinstone's India P. 120/121).

पूर्वी जे सहस्त्रग्रामाधिपति होते, त्यांचेंच वंशपरंपरेनें चालत आलेलें हजारे असें उपनांव, अजूनही दृष्टीस पडतें. तसेंच, वीस गांवांचे जे अधिपति होते, त्यांच्या कुळांत विशे असें अडनांव अजून देखील आढळतें.

असून, लोकांची वस्ती तिच्या आंतच असते. सांप्रतकाळीं, ही तटबंदी अथवा गांवकुसूं अगदीं मोडलें जाऊन, त्यांतील वस्ती त्या बाहेर फैलावली आहे.

प्रत्येक गांवाला पृथक् पृथक् ग्रामसंस्था आहे, व ही आपलें काम अगदीं स्वतंत्रपणें[1] चालविते. ह्या संस्थेंत हरएक प्रकारची तजवीज आणि सोय केलेली असते; त्यामुळें, गांवांतल्या विशेष जरूरीच्या कामाचा निर्वाह होऊन, हरवक्त येणारी अडचण दूर होते. गांवची जमाबंदी, गांवची शिबंदी ( पोलीस ), गांवचा लहानसहान न्याय, गांवचा बंदोबस्त, गांवचा चिल्हर खर्च, आणि तत्संबंधीं जरूर त्या कराची फाळणी, इत्यादि सर्व व्यवस्था आमची **ग्रामसंस्था** अगदीं बिनबोभाट करिते. मात्र, एकंदर सर्व साधारण देखरेखीच्या संबंधानें, ही

1 "Each town conducts its own internal affair s. It levies on its members the revenue due to the state; and is collectively responsible for the payment of the full amount. It manages its Police, and is answerable for any property plundered within its limits. It administers justice to its own members, as far as punishing small offences, and deciding disputes in the first instance. It taxes itself, to provide funds for its internal expenses; such as repairs of the walls and temple, and the cost of public sacrifices and charities, as well as of some ceremonies and amusements on festivals."

संस्था मुख्य **सरकारच्या** ताब्यांत असते; तथापि, गांवकीचा यच्चावत् कारभार ती स्वतंत्रपणें पाहते. गांवची सरस व नीरस भूमि, तसेंच लागवडीलायक व ओशिक जमीन, आणि माळ, खराबा, व गायरान, इत्यादींचा तपशील, आणि कुळारग नोंद, गांवाकडेच असते. त्यामुळें कुळवार फाळणी होऊन, गांवची जमाबंदी ठरविण्यास, किंवा वसूल करण्यास, अडचण पडत नाहीं. आतां, ही **ग्रामसंस्था** अशा प्रकारें, इतकी सुरळीतपणें, कोणत्या कारणांनीं चालते, आणि तिच्या घटकावयवांची कशी रचना आहे, याविषयीं विचार करूं.

पाटील व त्याचें कर्तव्य.

१ प्रथमतः, गांवचा मुख्य अधिकारी ह्मटला म्हणजे **ग्रामाधिपति** होय. ह्यालाच भिन्न भिन्न देशांतील रिवाजाप्रमाणें **पाटील, मुकाद्दम,** किंवा **मांदील,**

---

1 "It is provided with the requisite officers for conducting all those duties, and with various others adopted to the wants of the inhabitants; and though entirely subject to the general Government, is in many respects an organised commonwealth, complete within itself. This independence, and its concomitant privileges, though often violated by the Government, are never denied: they afford some little protection against a tyrannical ruler, and maintain order within their own limits, even when the general Government has been dissolved."

असें म्हणतात. हा मुख्यत्वेंकरून गांवची सर्व प्रकारची देखरेख करतो; व लहानसान गुन्ह्यांचा तपास करून इनसाफ होण्यासाठीं, त्यालाच थोडाबहुत फौजदारी अधिकारही दिलेला असतो. एकंदर गांवची जमीन किती लागवड असून ती कोणाकडे आहे, व गांवची पड किती राहिली आहे, याविषयीं देखील त्याला चांगला तपास ठेवावा लागतो. गावांत, पाटाच्या पाण्यानें कांहीं लागवड किंवा जित्रब होत असल्यास, त्याचा चोहोंकडे पुरवठा होऊन सर्वांस फेरपाळीनें पाणी मिळेल, असा बंदोबस्त राहण्यासाठीं तो तजवीज करतो. बगर हुकुमी लागवड, कमी जास्ती पड, गांवरानाचें रक्षण, शेतांच्या व हद्दीच्या खुणाची जतन, परागंदा कुळ, जन्म-मरण, बगर देवीची किंवा देवी न काढलेलीं मुलें, रोगाची साथ, अकस्मात् मृत्यु, अनाथ प्रेतसंस्कार, बिन धन्याचा माल, चोरीची मिळकत, इत्यादि महत्वाच्या सर्व गोष्टींचा तपास, व गुन्ह्यांचा तलास, गांवच्या **पाटला**लाच करावा लागतो. आणि गांवच्या जमाबंदीसंबंधीं वसूल बाकीचें कामही तोच करतो. तसेंच, गांवांत अंदेशावरून कोणाच्या घरीं झाडा घेणें असल्यास, त्याला प्रत्येक ठिकाणीं हजर राहवें लागतें, व तत्संबंधीं जरूर ती सर्व प्रकारची मदत देणें त्याला भाग पडतें.

**पाटील** हा गांवचा अधिकारीच पडल्या कारणानें,

त्याचें वजनं.

त्याचें गांवांत बरेंच वजन असतें. आणि त्यांतही तो सुशिक्षित, निःस्पृह, मनमिळाऊ, व विचारी असला ह्मणजे तर, त्याची ग्रामस्थांवर चांगलीच छाप राहते. प्रत्येक गांवकीचा तंटा त्याच्याकडे येतो. आणि प्रत्येक लहान मोठ्या महत्वाच्या बाबतींत गांवचे लोक त्याचीच सल्ला घेतात; व त्यामुळें त्याच्या मध्यस्तीची जरूर पडतें. फौजदारी इनसाफाचें काम तो एकटाच करतो. परंतु गांवकीचा तंटा, किंवा

गांव पंचायत.

जातीसंबंधी बखेडा, अथवा सार्वजनिक हिताची गोष्ट, इत्यादि विषयींचा विचार तो कधींही एकटा करीत नाहीं. अशा कामीं तो नेहेमींच **पंचाची** सल्ला मसलत, व साहाय्य घेतो; आणि त्यांच्या बैठकींत, सर्वानुमतें जें विहित ठरेल, त्या

---

1 "But I have good authority for saying that, in those parts of India in which the village-community is most perfect and in which there are the clearest signs of an original proprietory equality between all the families composing the group, the authority exercised elsewhere by the Headman is lodged with the Village Council. It is always viewed as a representative body, and not as a body possessing inherent authority, and whatever be its real number, it always bears a name which recalls its ancient constitution of Five persons."

(Maines' Village communities P. 123).

प्रमाणें झालेला ठराव अमलांत आणितो. **पंचा**चा न्याय, किंवा त्यांनीं केलेला ठराव, हा बहुत करून गांवच्या सर्व लोकांस संमत असतो. कारण, ह्या **गांवपंचायतींत** सर्व जातींचे आणि सर्व मतांचे **प्रतिनिधि** असतात; त्यामुळें, प्रत्येकाच्या समजुतीप्रमाणें उद्‌भवणाऱ्या अडचणींचें निरसन, व शंकेचें समाधान होऊन, सर्वांच्या अनुमतानेंच कायमचा ठराव होतो; आणि समाजाच्या कबुलीप्रमाणें तो अमलांत आणणें **पाटलास** भाग पडतें.

ही **पंचायत** संस्था स्थानिक स्वराज्याच्या मुलतत्वांपैकींच असून, ती **भरतखंडोद्‌भव** असल्याविषयीं अगदीं मतभेद नाहीं. तेव्हां, आह्मीं अनादिकालापासून भोगीत असलेले हक्क, आणि अत्युपयुक्त संस्था, व स्थानिकस्वराज्य, आमच्याकडे आमच्या **इंग्रज** प्रभूंनीं चालविणें केवळ अत्यवश्य व न्यायाचें आहे. परंतु ते हक्क अह्मांस न देण्याच्या हेतूनें, किंवा त्या संस्था अमच्याकडे चालू नयेत एतदर्थ, कांहीं तरी वितंडवाद करून आह्मां **भारतीयांस** कांहींनीं अयोग्य ठरवावें, अथवा हें स्वराज्यतत्व वैदेशिक असल्यामुळें, तें इकडे लागू करण्याला अजून **भारतीयां**ची पात्रता झाली नाहीं असें भलतेंच प्रतिपादन करावें, यासारखा दुसरा दुराग्रह तो कोणता ?

---

१ बंगालचे ले. गव्हरनर ईलियट साहेबानें बंगालच्या लोकांपासून

( पुढें चालू )

ही पंचायतपद्धत इकडे सर्वत्र जारीनें सुरू ठेवावी, ह्मणून सुमारें ६८ वर्षांमागें, एका अनुभवी इंग्रजी मुत्सद्द्यानें[1] लिहून ठेविलें होतें. पण त्याप्रमाणें कांहीं एक अम्मल न होतां, तें घोंगडें सुमारें ५५।५६ वर्षे तसेंच भिजत पडलें. त्यानंतर ज्यूरी पद्धति सुरू होऊन, त्या

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

जुरीनें चौकशी करण्याचा हक्क छिनावून घेतला, तेव्हां वर्तमानपत्रांतून तत्संबंधीं बरीच चर्चा सुरू झाली. ती पाहिली म्हणजे कांहीं आंग्लदेशीयांचा दुराग्रह तेव्हांच लक्षांत येईल. (इ० स० १८९२।९३).

१ हा गृहस्थ सर टॉमस् मनरो होय. हा मद्रासचा गव्हरनर असून, त्यानें इ० स० १८२५ सालीं, एक खालीं लिहिलेला लेख लिहून ठेविला आहे:—

"The introduction of trial by Jury should not be considered as an experiment which may be abandoned on the occurrence of any unforeseen obstacle, but as a measure, which though local at first, is to be steadily and systematically pursued until it shall be every-where established. We must make a beginning without being discouraged by any difficulty, whether real or imaginary. If we hold back from fear or in the expectation of discovering a plan, which shall be efficient at first, we shall never begin. We must not be discouraged by any want of success in our first attempts, but be confident that whatever is defective will be discovered and corrected by time and practice, and that the innate excellence of the institution will gradually carry it through every difficulty."

अधिकारदानाचा उपभोग प्रजा घेऊं लागली न लागली, इतक्यांत **वंगस्थक्षत्रपानें**[1] तो छिनाऊन घेण्याचा प्रयत्न केला. परंतु तो सिद्धीस गेला नाहीं, ही सुदैवाची गोष्ट होय.

चावडी; किंवा पंचायत भरण्याची जागा.

असो. **ग्रामप्रतिनिधींची** ही सभा, किंवा **पंचायत**, गांवच्या चावडींत भरते. प्रत्येक गांवाला, गांवच्या समाईक उपयोगाकरितां, बहुत करून एकादी सार्वजनिक इमारत बांधलेली असते, व तिला **चावडी** असें ह्मणतात. येथें हरएक बाबतीचा विचार होण्यासाठीं, गांवचें लोक **पंचा**सहित जमतात, आणि नंतर तत्संबंधीं भवति न भवति होते. जेथें चावडी नसते तेथें, हा जमाव गांवांतील कोणत्या तरी एकाद्या देवालयांत जमतो. किंवा, जेथें असें देऊळहीं नसतें तेथें, **पाटला**च्या घरीं, अथवा अन्य संभावित गृहस्थाच्या मकाणांत, गांवची सर्व शिष्ट मंडळी एकत्र होते.

ग्राम सभेचें राजकीय किंवा सामाजिक दृष्टीनें महत्व व तिचें प्रातिनिधिकत्व.

राजकीय किंवा सामाजिक दृष्टीनें, ही **ग्रामसभा** अथवा **गांवपंचायत** विशेष महत्वाची होय. कारण, ही पंचायत प्रातिनिधिक असण्याविषयीं, आणि तींत

१ नामदार ईलिभट. ले० गव्हरनर, बंगाल.

प्रत्येक वर्णाच्या मताचें योग्य प्रदर्शन व्हावें एतदर्थ, आरंभापासूनच चांगली खबरदारी घेतली जाते. प्रत्येक सामाजिक हिताहिताची गोष्ट, जातीसंबंधीं तंटा, धर्मसंबंधीं अथवा इतर गांवखर्च, अकस्मात् उपस्थित झालेल्या अरिष्टाचें निरसन, आणि तत्संबंधीं कराचा बोजा, इत्यादि प्रत्येक सार्वजनिक काम लोकांच्या सल्ल्याशिवाय कधींही होत नाहीं. व ही सल्लामसलत घेऊन एक विचारानें बंदोबस्त होण्या-

1 "I shall have hereafter to explain that, though there are strong general resemblances between the Indian village-communities wherever they are found in any-thing like completeness, they prove on close inspection to be not simple but composite bodies, including a number of classes with very various rights and claims. One singular proof of this variety of interests, and at the same time of the *essentially representative character of the village-council* is constantly furnished, I am told, by a peculiar difficulty of the Anglo-Indian functionary when engaged in 'settling' a province in which the native condition of society has been but little broken up. The village-council, if too numerous, is sure to be unmanageable; but there is great pressure from all sections of the community to be represented in it, and it is practically hard to keep its numbers down."

(Maines' Village-communities.
P. P. 123/124)

साठीं, प्रत्येक बाबतींत प्रसंगानुसार **ग्रामसभा** भरते. त्या वेळीं गांवचे सर्व शिष्ट लोक एकत्र जमतात, आणि आपापलीं मतें प्रदर्शित करण्यासाठीं ते सर्वानुमतें कांहीं निवडक लोक नेमून देतात, व त्यांसच **पंच** असें म्हणतात. ह्या **पंचा**वर लोकमताचें विशेष दडपण असतें, त्यामुळें तें एक बाजूला ठेऊन आपल्याच इच्छेप्रमाणें त्यास कोणताही अभिप्राय देतां येत नाहीं, अथवा एकादा भलताच ठरावही करतां येत नाहीं. कारण, क्वचित् प्रसंगीं लोकमताविरुद्ध **पंचा**चा ठराव झालाच तर, तो अमान्य होतो व अमलांत येत नाहीं. इतकेंच नाहीं तर, त्यामुळें त्यांची मानखंडणा होते, आणि लोकांचा त्यांजवरील विश्वासही उडतो. तेव्हां लोकमताविरुद्ध जाऊन, आपल्या हातानें आपला अपमान करून घेण्याचें साहस कोणी देखील करीत नाहीं.

लोकमताचें, ग्रामसभेंत, आाणि भारतवर्षांत, प्राबल्य.

याप्रमाणें लोकमताचें प्राबल्य केवळ **ग्रामसभें**तच आहे असें नाहीं. तें इतर खंडांप्रमाणें आमच्या **भारतवर्षां**त देखील सर्वत्र आहे. आणि त्याचा अनादर कोणीही करीत नाहीं; अथवा क्वचित्

१ आर्यपौराणशास्त्रान्वयें ह्या सर्व पृथ्विची एकंदर नऊ खंडें खालीं लिहिल्याप्रमाणें कल्पिलीं आहेत:—

१ कुरु. २ हिरण्मय. ३ रम्यक. ४ इलावृत्त. ५ हरि. ६ केतुमाला. ७ भद्राश्व. ८ किन्नर. व ९ भारत.

प्रसंगीं कोणी केल्यास त्याबद्दलचें प्रायश्चित्त त्यांस खचित भोगावें लागतें. ह्या लोकमताच्या प्रभावाची व्याप्ति केवळ नियमित व्यक्तींत किंवा प्रदेशांत दिसून येते असें नाहीं. तर ती यच्चावत् सर्व ठिकाणीं, आणि रावापासून तों रंकापर्यंत, सर्वकाळ दृष्टीस पडते. महान् पराक्रमी आणि **चक्रवर्ती** राजा **रामचंद्र** यानें देखील, केवळ लोकमतालाच मान देऊन, आपली पवित्र, अतिप्रिय, व सर्व श्रेष्ठ पत्नी **सीता** हिचा, ती निरपराधी असतांहि, त्याग केला. आतां, ह्यावर कोणी कदाचित् असा आक्षेप घेईल कीं, ही **पौराणिक** काळची गोष्ट झाली; तेव्हां त्याकाळीं जितकें लोकमत बलवत्तर होतें तितकें ऐतिहासिक काळांत, किंवा निदान हल्लीं तरी, दिसून येत नाहीं. परंतु हें म्हणणें केवळ पोकळ असून, अगदींच निराधार आहे. कारण, ऐतिहासिक कालांत देखील लोकमताचें प्राबल्य चांगलें व्यक्त होत असून, प्रसिद्ध राजा **भर्तृहरि** यानें देखील, लोकापवादाचें भय बाळगावें, असा उपदेश आपल्या **नीतिशतकां**त केला आहे.

“ **विद्यायां व्यंसनं स्वयोषिति**
**रतिर्लोकापवादाद्भयम् ॥** ”

**भर्तृहरि** हा इसवी सनाच्या सातव्या शतकांत उदयास आला असून, तेव्हांप्रमाणेंच, हल्लींही लोकमताचा पगडा कायमच आहे. **पेशवाई**चा प्रखर सूर्य तपत असतां,

सुप्रसिद्ध **ब्राह्मण**वीरावतंस **परशुरामभाऊ पटवर्धन,** हे उदयास आले होते. त्यांची **बयाबाई** नांवाची एक वडील कन्या असून, तिचें लग्न झाल्यानंतर सुमारें पंधरा दिवसांच्या आंतच, तिचा पति निवर्तला. त्यावेळीं, तिचें वय अजमासें सात किंवा आठ वर्षांचें होतें. सबब, तिची स्थिति **भाऊंनीं पुण्यांतील** विख्यात **रामशास्त्री** यांस कळविली. त्यावेळीं त्यांचें हृदय द्रवलें, आणि त्या प्रसंगीं त्यांनीं निर्भिडपणें आपला असा अभिप्राय दिला कीं, अशा अर्भकाचा पुनर्विवाह करण्यास बिलकुल प्रत्यवाय नाहीं. तदनंतर **भाऊंनीं श्रीक्षेत्र काशीहून** देखील शास्त्रार्थ आणविले, व त्यांत सर्वांनींच पुनर्विवाहाविषयीं आपली संमति प्रदर्शित केली. तथापि, " **यद्यपि शुद्धं लोक विरुद्धं नो चरणीयं नो करणीयम्,** " असें कित्येकांनीं **भाऊंस** सुचविल्यावरून त्यांनीं लोकमताचा अनादर होऊं नये एतदर्थ, स्वकन्येच्या पुनर्विवाहाचा बेत अजिबात रहित केला. आणि हा लोकमताचा प्रभाव आपल्याला आजमितीसही चांगल्या प्रकारें दृष्टिगोचर होत आहे. असें असूनही, कांहीं कांहीं दुराग्रही व वृथाभिमानी **पाश्चात्यांचें** असे उद्गार कानीं पडतात कीं, **प्राच्यदेशांत,** ह्मणजे **आशियांत,** किंवा **भरतखंडांत,** लोकमत ह्मणून काडीमात्र देखील नाहीं. तेव्हां हें त्यांचें मत किती अज्ञानमूलक आहे, हें जास्त सांगावयास नलगे.

असो. अशा प्रकारें लोकमताचें प्राबल्य जबरदस्त असल्या कारणानें, त्याचा आन्हेर गांवचे **पंच** बिलकुल करूं शकत नाहींत. आणि त्यामुळेंच, ग्रामस्थांच्या बहुमताविरुद्ध कोणतीही गोष्ट बहुतकरून बिलकुल घडून येत नाहीं.

ग्राम संस्थेची संघशक्ति, व पाटलाची इतिकर्तव्यता.

ह्या **ग्रामसंस्थे**च्या संबंधानें, दुसरी एक विशेष महत्वाची आणि ध्यानांत ठेवण्यासरखी गोष्ट आहे. ती ही कीं, हिच्यांत कांहीं विलक्षण प्रकारची **संघशक्ति** आहे. हरएक प्रकारचें राजकीय, किंवा सामाजिक, अथवा धर्मसंबंधीं काम असो, त्याबद्दलची ताबडतोब तजवीज गांव लोक करतात. कारण, अमुक एक काम विशेष निकडीचें आहे असें **पाटला**ला कळतां क्षणींच, तो गांवचे लोक व **पंच** बोलवितो. ते कामाची जरूरी पाहून लागलेच एकत्र होतात, आणि सर्वानुमतें इष्ट असा ठराव करून तो ताबडतोब अमलांत आणितात. पूर्वीच्या धामधूमीच्या कालांत तर, गांवकींची जूट आणि एकी अशी कांहीं विलक्षण होती कीं, गांवचे लोक केवळ ह्या **संघशक्ती**च्या योगानें शत्रूच्या हल्ल्याचेंही निवारण करून, आपला गांव बचावीत. **पाटील** व **पंच** यांच्या सल्ल्याप्रमाणें ते एक दिलानें शत्रूवर तुटून पडत, व आपलें संरक्षण करीत. सद्यःस्थितींत देखील एकादा शत्रू डोईजड व मोठा असला,

व त्याचें निवारण होण्यास ग्रामबल अनुचित असलें, तर **पाटील** व **पंच** हे त्याची अन्य तऱ्हेनें पाठवणी करितात; आणि अशा प्रकारच्या हरएक तजवीजीस गांवचे लोक अनुकूल होतात. क्वचित् प्रसंगीं लुटारू व भामटे लोक देखील हत्यारबंद होऊन गांवांत शिरतात, आणि अमुक एक रकम गांवांतून वसूल झाली तरच कोणाला इजा केल्याशिवाय निर्विघ्नपणें आपण गांव सोडूं, नाहींपेक्षां सर्वांस लुटून गांव फस्त करून टांकूं, अशी ते गांवकरी लोकांस धमकी देतात. अशा प्रसंगीं, **ग्रामाधिकारी** किंवा **पाटील** आपल्या गांवच्या ऐपतीप्रमाणें, व ज्याच्या त्याच्या शक्यनुसार वर्गणीनें, जरूर ती पैशाची भरती अथवा इतर सामग्री करून देऊन, आलेलें विघ्न टाळतो.

राजाच्या किंवा आपल्या वरिष्ठाच्या कानावर एखादी सामाजिक सुखदुःखाची गोष्ट घालणें झाल्यास, अथवा रयतेचें गाऱ्हाणें व हरद्र त्यांस कळविणें असल्यास, गांवचे सर्व लोक **पाटला**ला पुढारी करून जमावानें जातात, आणि आपली सर्व हकीकत त्यास निवेदन करितात. अशा प्रसंगी, बोलण्याचें ह्मणजे दुःखनिवेदन करण्याचें काम बहुत करून **पाटला**कडेसच सोंपविलेलें असतें; व तो **ग्राममुख** पडल्या कारणानें, तें काम उरकणेंही त्यास भाग पडतें.

सरकारी कामगार, किंवा इतर सभ्य गृहस्थ गावांत

चिल्हर खर्च, व आल्यागेल्याची बरदास्त.

आल्यावर, त्याची पूसतपास करण्याचें काम **पाटला**चें असतें. तसेंच, गावांत उपलब्ध असलेली जरूर ती चीज वस्त त्याला देऊन, त्याची **पाटलाला** बरदास्तही ठेवावी लागते. **गुजराथ** प्रांतांत **चोराखर्च** म्हणून पाटलाला विशेष नेमणूक असून, ती ज्या मानानें गांव लहान मोठा असतो, त्याप्रमाणें कमी जास्ती असते. कोठें कोठें **चिल्हरखर्च** म्हणून **पाटलाला** विशेष रकम मिळते; आणि जेथें जेथें अशी फालतू रकम दिलेली असते, तेथें तेथें आल्यागेल्याचा खर्च व त्याची सरबराई, ह्या रकमेंतूनच होते. परंतु ज्या ठिकाणीं अशी स्वतंत्र योजना केलेली नसते त्या ठिकाणीं, अशा प्रकारचा थोडा बहुत खर्च व आल्यागेल्याची वर्दळ **पाटलावरच** पडते.

ह्या खर्चांतूनच **चावडी** वगैरेची वार्षिक दुरुस्ती होते.

इतर सार्वजनिक खर्च, व त्याचा समाईक बोजा.

तथापि, देवालय, धर्मशाळा, किंवा इतर सार्वजनिक इमारत, इत्यादिकांचा जीर्णोधार, वर सांगितलेल्या विशेष नेमणूकींतून होण्यासारखा नसतो. ह्मणून अशा बाबतीचा कांहीं नैमित्तिक खर्च करणें झाल्यास, **पाटील** तत्संबंधीं सर्व हकीकत **पंचांस** व इतर ग्रामस्थांस जाहीर करतो. तदनंतर, त्या बाबतींत भवति न भवति होते, आणि असा खर्च करणें अगदीं अवश्य आहे, असें सर्वानुमतें

ठरलें ह्मणजे, वर्गणीनें जरूर त्या पैशाची रकम जमा होते, व मनांत आणिलेलें काम तडीस जातें.

गांवांत कांहीं साथ आली, किंवा वाखा सुरू झाला, अथवा अवर्षण पडलें, किंवा आकस्मिक अरिष्ट उद्भवलें तर, होमहवनादि धर्मकृत्य करण्यासाठीं, अथवा बळी वगैरे काढण्याकरतां, जी व्यवस्था व्हावयाची ती सदरीं लिहिल्याप्रमाणें वर्गणीनेंच होऊन, **पाटील**, किंवा **पंच**, अथवा अन्य **ग्रामाधिकारी**, यांजकडेसच तत्संबंधीं पुढाकार सोंपतात.

किरकोळ बाबतींत पाटलाचा हुकूम, व तो अमलांत आणण्या विषयीं रयतेची तत्परता.

पर्जन्य पडला ह्मणजे, पड जमिनीची व बगर हुकमी लागवडीची पाहणी करण्याविषयींचा जसा **पाटला**वर बोजा आहे, त्याचप्रमाणें बरसांत खलास झाल्यानंतर, शेतांतील वाटांच्या मेरा घेणें, आणि जाण्यायेण्याचे मार्ग चोखाळणें, याविषयीं देखील त्यालाच तजवीज करावी लागते. तथापि, ह्या कामाच्या संबंधानें त्याला विशेष प्रयास पडत नाहींत. कारण, गांवचे सर्व खातेदार, आणि कसणारी कुळें, ह्यांत तो एकदां दवंडी पिटवून गांव **महारा**कडून खसूस ताकीद देतो कीं, ज्यांनीं त्यांनीं अपापल्या हद्दींतलें गवत काढून, वाटा साफ कराव्या व मार्ग चोखळून ठेवावे. त्याप्रमाणें जो तो आपल्या धंद्यास लागतो, आणि **पाटला**च्या हुकमाप्रमाणें सर्व कांहीं अमलांत आणतो. वाटा चोखळून जाण्यायेण्याचे मार्ग

खुले करण्याचें काम, तसेंच शेतांतील बांध फोडून रस्ते साफ करण्याचें काम, जरी प्रथम दर्शनीं कुच् किमतीचें व क्षुल्लक दिसतें, तरी तें फारच महत्वाचें असून, त्यापासून मोठा उपयोग होतो. पर्जन्यामुळें चोहोंकडे ऊंच ऊंच गवत माजतें, व त्यायोगानें पूर्वी सुरू असलेल्या रस्त्यांची यत्किंचित् देखील निशाणी राहत नाहीं. अशा स्थितींत व्यापार सुरू होण्याला अटकाव होतो, व त्यामुळें सर्वत्र मंदी असते. परंतु, दळणवळणासंबंधी एकदां कां तेच मार्ग खुले झाले ह्मणजे पूर्ववत् हालचाल सुरू होते, आणि गांवाला चांगली तेजी येते. हें, व अशा प्रकारचें साधारण किरकोळ काम, केवळ पाटलाच्या नुस्त्या ताकीदीनेंच उठतें; आणि त्यांतही तो न्यायी व सरळ मनाचा असला ह्मणजे तर, त्याला गांवकीच्या बंदोबस्तांत कधींच हरकत येत नाहीं.

पाटील व ग्रामाधिपतीचें वेतन.

**मनुस्मृतींत, ग्रामाधिकाऱ्यांच्या वेतनाची** तजवीज केलेली. असून, त्यापेक्षां वरिष्ठ दरज्याच्या कामगारांच्या नेमणुकी विषयीं देखील, त्यांतच योजना केली

१ यानि राजं प्रदेयानि प्रत्यहं ग्रामवासिभि :।
अन्नपानेन्धनादीनि ग्रामिकस्तान्यवाप्नुयात् ।। ११८ ।।
दशी कुलंतु भुंजीत विंशी पंच कुलानिच
ग्रामंग्रामशताध्यक्षः सहस्राधिपतिः पुरम् ।। ११९ ।।
( मनुस्मृति. अ. ७ )

असल्याचें चांगलें व्यक्त होतें. अन्न, पान, इन्धन, इत्यादि रोजची दिनचर्येची सामग्री, ग्रामस्थानीं ग्रामाधिकाऱ्यास दिली पाहिजे, असें स्मृतिवचन आहे. त्यावरून, ग्रामाधिकाऱ्याच्या वेतनाबद्दल, तितका बोजा जात्या गांवावर असून, तत्संबंधीं थोडी बहुत जमीन अगदीं निराळीच तोडून दिली असावी असें अनुमान होतें. वरिष्ठ अधिकाऱ्यास याहीपेक्षां कांहीं विशेष नेमणूक दिल्याचें दिसतें. कारण १० **दश** ग्रामाधिपातिला एक कुल[1]भर म्हणजे सुमारें सहा नांगरांची[2] जमीन देण्याविषयीं सांगितलें असून, २० **विंशति** ग्रामाधिपतीला पांच कुल किंवा सुमारें तीस नांगराची जमीन देण्याविषयीं वर्णन आहे. तसेंच, १०० **शत** ग्रामाधिपतीला एकादां गांव, आणि

१ अष्टा गवं धर्म हलं षड्गवं जीवितार्थिनाम् ।
चतुर्गवं गृहस्थानां त्रिगवं ब्रम्हघातिनाम् ।
(हारित स्मृति)

ह्या स्मृति अन्वयें, मध्यम प्रकारचा नांगर म्हटला म्हणजे सहा बैलाचा असून, अशा दोन नांगरानीं जेवढी जमीन खेडली जाईल, तेवढ्या भूमिभागाला कुल अशी संज्ञा आहे.

२ एक नांगराची जमीन म्हटली म्हणजे, ती बहूतकरून तीन पासून चार बिघ्यांपर्यंत असते. कोंकणांत एका नांगराला सामान्यतः दोनच बैल जुंपण्याची वहिवाट असून, ह्या दोन बैलांच्या नांगरानें अजमासें तीन पासून चार बिघ्यांपर्यंत जमीन लागवड होते. घाटांवर एका नांगराला दोन पासून आठ पर्यंत बैल लावतात, व त्यामानानें तितकी जास्त जमीन खेडली जाते.

१००० सहस्र ग्रामाधिपतीला एकादें शहर, वतन म्हणून द्यावें, असें स्मृतिकार म्हणतात.

हल्लीं देखील, पाटलास त्याच्या नोकरीबद्दल, इनाम जमीन किंवा रोकड नेमणूक असते. नोकरी बद्दलच्या इनामाला वेतन[1] अशी संज्ञा असून, तत्संबंधाच्या नक्त नेमणुकीला पंचोत्रा किंवा मुशाहिरा ह्मणतात. गांव जसा लहान मोठा आणि महत्वाचा असेल, त्या मानानें ही नेमणूक बांधून टाकतात, व गांवच्या जमाबंदी-वर तिची फाळणी करतात. तथापि, ही नक्त नेमणूक देण्याची वहिवाट इंग्रजी अमलापासूनच सुरू झाली.

तत्संबंधीं इनाम-जमीन व रोकड नेमणूक.

त्या पूर्वी ज्याच्या त्याच्या कामाच्या स्वरूपाप्रमाणें, गांवच्या व परगण्याच्या सर्व नोकरांस इनाम जमीनच वांटून दिलेली असे. हल्लीं, नोकरी साठीं ह्मणून, इंग्रज सरकार नवीन जमीन मुळींच देत नाहीं. मात्र, जी जमीन पूर्वीपासून चालत आली आहे, ती तें राखतें. किंवा प्रसंगानुसार, कमिजास्ती जरूरीप्रमाणें, तींत कमज्यास्त व थोडा बहुत फेरफार करण्यांत येतो. इंग्रजी मुलुखांत, कांहीं

---

१ हा शब्द, " वेतन " किंवा " वृत्ती " या संस्कृत शब्दांपासून झाला असावा असें वाटतें. ग्रांट्डफ्च्या मतें हा शब्द आरबी असून, याचा अर्थ " स्वदेश " असा आहे.

( ग्रां. ड. कृत इतिहास. पान १८।१९ पहा. )

भागांत; गांव नोकरांस इमानी जमीन असून, शिवाय नक्त नमणूकही असते. कचित् ठिकाणीं, त्यांजकडे नुस्ती इनामी जमीनच चालते. आणि कोठें कोठें तर, त्यांजला फक्त रोकड नेमणूकच मिळते. हें वतन कितीही थोडें किंवा अपुरेसें असलें तथापि, तें कोणी देखील सोडण्यास तयार होत नाहीं; अथवा तें टाकून देण्यासही कोणी इच्छीत नाहीं. इतकी वतनीं आणि इनामी जमिनीविषयीं आह्मां भारतीयांची आसक्ति व प्रीति असते.

पाटील हा प्रजेचा प्रतिनिधि, व सरकारचा नोकर.

वास्तविकपणें, **पाटील** ह्मणजे लोकनियुक्त **ग्रामाधिकारीच** होय. आणि ह्मणूनच त्याला ग्रामप्रतिनिधि ह्मणण्यास यत्किंचितही हरकत नाहीं. कारण;

1 "A town-ship in its simplest form is under a Headman, (called Patel in the Deckan and in the West and Centre of Hindustan; Mandel in Bengal; and Mokaddam in many other places, especially where there are or have lately been heriditory village land-holders), who is only spoken of in Manu as are agent of the king, and may have been removable at his pleasure. His office has now become heriditory; and though he is still regarded as an officer of the king, he is really more the representative of the people. The selection of an individual from the proper family rests sometimes with the village community, and oftener with the Government; but to

( पुढें चालू )

ग्रामस्थांच्या मतांशीं त्याचें इतकें ऐक्य असतें कीं, तो सांगतो तें त्यांस प्रमाण वाटतें, व त्याच्या सल्ला मसलतीं प्रमाणेंच ते आपलें वर्तन ठेवितात. त्याची नेमणूक **सरकार** करतें, आणि त्याच्या अधिकारांतील हरएक भरंवशाचें काम तें त्याला सांगतें. त्याजवर **राजा** आणि **प्रजा** या दोघांचाही पूर्ण विश्वास असतो; व तो निरंतर तसाच राहण्यासाठीं, **पाटलाला** देखील चांगली खबरदारी घ्यावी लागते. ह्या उभयपक्षांकडील विश्वासाचा **पाटील** बहुत करून कधींही दुरुपयोग करीत नाहीं; परंतु क्वचित् प्रसंगी केल्यास, त्याला फार कडक शिक्षा होते, व त्याबद्दल महत् प्रायश्चित्त भोगावें लागतें. हा वतनदार

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

be useful to either he must possess the confidence of both. He holds a portion of land, and receives an annual allowance from the Government; but the greater part of his income is derived from fees paid by the villagers. So far is he identified with the village, that he is held-personally responsible for its engagements, and thrown into prison in all cases of resistance or failure of the revenue." * * *

"He * * * apprehends offenders, and sends them to the Government officer of the District; and in-short, does all the duties of Municipal Government."

( Elphinstones' History of India
P. P. 124-125, 486.)

असून ह्याची नेमणूक वंश परंपरेनें चालते, आणि **ग्राम-संस्थेचें** सर्व चालकत्व व तत्संबंधीं यच्चावत् जबाबदारी त्याच्याकडेसच असते.

**पाटला**च्या गैरहजिरींत जो कोणी गांवचा कारभार पाहतो त्याला **कारभारी** अशी संज्ञा असून, सर्व पाटलांत जो प्रमुख त्याला-**सरपाटील** असें म्हणतात.

ग्रामलेखकाचें काम.

२ **ग्रामलेखक** याजकडे गांवचें सर्व लिहिण्याचें काम असतें. त्याला गांवच्या सर्व जमीनीची नोंद ठेवावी लागत असून, तींत १ गांवचें एकंदर कमाल; २ बिन आकारी कीर्दसार; ३ लावणीलायक नाहीं अशी जमीन; ४ विशेष कामाकडे ठेविलेली जमीन ह्मणजे गांवठण, स्मशानभूमि, लष्कर उतरण्यासाठीं व तंबू मारण्याकरितां जागा, इत्यादि; ५ सार्वजानिक कामासाठीं राखलेली जमीन ह्मणजे गुरचरण, सरकारी जंगल, इत्यादि; ६ सरकारी व रयत उपयोगी गांव नोकर आणि परगण्याचे वतनदार, यांच्या वतनाची जमीन; ७ इनामदारांची इनाम जमीन; ८ तत्संबंधीं जुडी; ९ कीर्दसार आकारी पड; १० आकारी लागण जमीन; आणि ११ इतर किरकोळ उत्पन्न; वगैरे सर्व तपशील दाखल करावा लागतो. गांवच्या जमाखर्चाचा हिशेब तोच मांडीत असून, एकंदर ठरलेल्या **जमाबंदी** पैकीं कोणाकडे, किती, आणि कशाबद्दल **सरकार**चें येणें आहे, ह्याचा नांवनिशीवार

व कुळारग दाखला तो ठेवतो; आणि प्रसंगानुसार लोकांच्या अर्ज्या, व खतें, हीं देखील तोच लिहितो. ह्याला **उत्तर-हिंदुस्थानांत पटवारी, गुजराथेंत तलाठी, महाराष्ट्रांत कुळकर्णी,** आणि **दक्षिण हिंदुस्थानांत कर्णम्,** असें ह्मणतात. **महाराष्ट्र** देशांत आणि इतर कांहीं भागांत हा वतनदार नसून पगारदार असल्यास, त्याला **कुळकर्णीच्या** ऐवजी **तलाठीच** म्हणण्याचा प्रचार आहे.

**देशाधिकारी, देशमुख, देशपांडे, देशलेखक,**

---

1 "The accountant keeps the village records which contain a full description of the nature of the lands of the village, with the names of the farmer and present holders, the rent, and other terms of occupancy. He also keeps the accounts of the village-community, and those of the villagers individually, both with the Government, and with each other. He acts as notary in drawing up deeds for them, and writes private letters for those who require such a service. He is paid by fees on the inhabitants, and sometimes has an allowance or an assignment of land from the Government."

(Elphinstone's History of India
P. P. 125/126).

2 Called "Patwàri in Hindustan; Kulkarni and Karnam in the Deckan and south of India; Tallátte in Guzeràt."

(Elphinstone's History of India P. 486).

इतर जमीदारांची कामें, व त्यांचे हक्क.

देसाई, चौधरी, कानोंगो, सरखोत, जमीनदार, आणि तलाठी, यांजकडे देखील लिहिण्याचेंच काम असतें. तलाठीखेरीज करून बाकीचे सर्व वतनदार, सरकारी नोकर असून, त्यांच्याकडे वतनाची जमिन वंशपरंपरेनें चालते, आणि गांवच्या जमाबंदीवर त्यांजला कांहीं रोकड हक्कही मिळतो. ह्यांच्याकडे देश रिवाजाप्रमाणें, अनेक तऱ्हेचीं कामें असतात. लागवड, ओशीक, आणि पिकाच्या निमताना; जमाबंदीचें काम; अहवालाचे कागद तयार करण्याचें काम; जबाबीकाम; फेरणी कारकुनाचें काम; दफतराचें संरक्षण; इत्यादि रहएक प्रका-

---

१ ही जमीन गांवच्या लागण जमीनीं पैकीं, $\frac{१}{२०}$ एक विसांशाच्या $\frac{१}{२०}$ हिश्याची असते,

२ रोकड हक्क गांवच्या उत्पन्नावर शेंकडा पांच टक्याप्रमाणें देण्यांत येतो, असें प्रसिद्ध इतिहासकार ग्रांटडफ यांचें ह्मणणें आहे.

"Though the services of the Deshmookhs and Deshpàndes are in general dispensed with, they continue to be paid by a portion of land in different parts of their district, which may be estimated at about one twentieth of the arable soil, and a twentith of the Government revenue, or five percent ·parately collected by them, and calculated agree- v to the revenue actually realized."

(Grant Duff's History of the Marathas P. 17),

रचें काम त्यांजला करावें लागतें. **इंग्रजी** मुलुखांत **कुळकर्णी** आणि **तलाठी** ह्याशिवाय, बाकीच्या सर्व नोकरांस नुकसानीचा कांहीं मोबदला देऊन, त्यांच्याकडील यच्चावत् कामें सरकारनें काढून घेतलीं आहेत. परंतु **संस्थानिक** मुलुखांत, त्यांजकडील चालत आलेली नोकरी त्यांच्याकडून अजूनही बहुतकरून घेण्यांत येते.

देशाधिकारी, व देशमुख.

ज्याप्रमाणें **ग्रामा**धिकारी गांवची देखरेख ठेवितात, त्याप्रमाणें **देशा**धिकारी प्रांताचा किंवा देशाचा बंदोबस्त राखतात. **देशमुख** म्हणजे केवळ देशाचें **मु**खच ( तोंड ) असून, प्रांतिक सुखदुःखाचा अहवाल, अथवा कमिजास्ती हकीकत, रयतेच्या तर्फेनें त्यांजलाच राजाकडे, किंवा वरिष्ठ ठिकाणीं, कळवावी लागते. सबब, त्यांस गांवचे अथवा देशाचे वक्ते, किंवा पुढारी अशी संज्ञा आहे.

ग्रामयाजक.

३ **ग्राम**याजक याजकडे ग्रामदेवतांच्या पूजेचें काम असतें, व त्यालाच गुरव अशी संज्ञा आहे. हा गांवांतील देवाळयांचा झाडसारव करून त्यांतील देवांची नित्यशः पुजा करतो. व पत्रावळी आणि द्रोण लावून, जो कोणी सरकारी कामगार गांवांत येईल, त्याजला व गांवकऱ्यांस, त्या पुरविण्याचें कामही त्याच्या कडेसच सोंपविलेलें असतें; सबब तत्संबंधीं त्याला

बंदोबस्त ठेवावा लागतो. **कर्नाटकांत** हा गुरव लिंगाईत जातीचा असतो, व त्याला **जंगम** अशी संज्ञा आहे.

ग्राम ज्योतिषी.

४ **ग्राम**ज्योतिषाकडे दिवस आणि तिथी पहाण्याचें काम असून, तो पंचांग व जन्मपत्रिका तयार करितो, आणि शुभाशुभ दिवस सांगतो. ह्यालाच गांवजोशी असें ह्मणतात.

ग्रामकर्मार.

५ **ग्राम**कर्मार ह्मणजे गांव लोहार होय. नांगराला फाळ लावणें, गाडीच्या चाकाची धांव बसाविणें, कडीकोयंडा तयार करणें, इत्यादि गांवचें सर्व घिसाडीकाम त्याच्याकडेसच असतें.

ग्रामतक्ष.

६ **ग्राम**तक्ष हा गांवचा सुतार होय. हा गांवकऱ्यांचे नांगर, त्यांच्या गाड्या, आणि प्रसंगानुसार त्यांचीं घरें देखील नीट व तयार करतो.

ग्रामकुलाल.

७ **ग्राम**कुलाल ह्मणजे गांवचा कुंभार असून, तो गांवचा मडकीं, पणत्या, चुली, विटा, काल, इत्यादि तयार करतो. व गांवांत कोणी सरकारी कामगार आल्यास, त्याला जरूर तितकीं मडकीं पुरविण्याचें काम असतें; सबब तत्संबंधींही त्यालाच बंदोबस्त ठेवावा लागतो.

८ **ग्राम**रजक ह्मणजे गांवचा धोबी होय. ह्याच्याकडे

ग्रामरजक. ग्रामस्थांचे कपडे धुण्याचें काम असून, लग्न समारंभांत कोणास पायघड्या घालणें असल्यास त्याला तो कपडे पुरवितो.

९ ग्रामनापिताकडे गांवांतील लोकांच्या हजामती करण्याचें काम असतें; आणि क्वचित् प्रसंगीं ते वाजंत्र्याचेंही काम बजावितात. तसेंच, जरूर लागेल तेव्हां, ते चंपी करतात, व तुंबड्याही लावितात.

ग्रामनापित.

१० ग्रामपाल ह्मणजे गांवजागले होत. हे रात्रीं टेहळे ठेवून, गांवचा पहारा करतात; आणि कोणी सरकारी कामदार गांवांत आल्यास त्याला रात्रीं सोबत करून, त्याची चीजवस्त सांभाळतात. क्वचित् ठिकाणीं, ही कामगिरी रामोशी व भील करतात.

ग्रामपाल.

११ ग्रामवैतालिक हा गांवचा कवि होय, व ह्यालाच भाट असें ह्मणतात. ह्या भाटगणांत, कांहीं कांहीं तर निसर्गतःच शिघ्रकवि असतात.

ग्रामवैतालिक.

१२ ग्रामगोदुह हा गांवचा गौळी असून, त्याच्याकडे दूधदुभतें पुरविण्याचें काम असतें.

ग्रामगोदुह.

१३ ग्रामघातिन् ह्मणजे गांवखाटिक होय. हा मांस-

ग्रामघातिन्.

हारी लोकांकरितां, पशुपक्ष्यादि-
कांचें हनन करतो.

ग्रामप्रेष्य, व त्याचें विविधकर्म.

१४ ग्रामप्रेष्य हा गांवचा माहार असून, त्याच्याकडे पुष्कळ प्रकारचीं कामें असतात. गांवच्या व शेतांच्या हद्दींचें संरक्षण तोच करतो; व पिकाच्या हंगामांत जें जें पीक तयार होतें, त्याजवरही त्यालाच देखरेख ठेवावी लागते. गांवांत कोणी आला, किंवा गांव सोडून कोणी परठिकाणीं गेला, तर त्याला वाट दाखविण्याचें काम ह्यालाच करावें लागतें. क्वचित् प्रसंगीं वेठबिगार देखील ह्याच्यावरच पडते; आणि तसें झालें म्हणजे आलेली पेंड तो आपल्या गांवच्या हद्दीबाहेर कशी तरी पोहोंचवितो. पाटील, कुळकर्णी, तलाटी, ग्रामशिक्षक, ह्मणजे गांव पंतोजी, आणि इतर सरकारी नोकर, ह्यांचें टपालही त्यालाच पोहोंचवावें लागतें. असें काम बहुत करून तो हजरपेंडावर करतो; म्हणजे आपल्या हद्दींतील कामगिरी दुसऱ्या गांवापर्यंत पोहोंचवून, त्या गांवच्या माहारास ती अन्यत्र न्यावयास सांगतो. या प्रमाणें विवक्षित स्थलावर ती पेंड पोहोंचेपर्यंत, गांवोगांवचे माहार तीस हातबोट लावितात. ज्या ठिकाणीं अशी कामगिरी करण्यास माहार उपलब्ध नसतात, किंवा जातीसंबंधीच्या अडचणीमुळें दुसरी एकादी कामगिरी उठविण्यास माहारांचा तादृश उपयोग नसतो,

तेव्हां गांवचे अन्यजातीय वेठे देखील, येईल ती कामगिरी उठवून, आपल्या गांवांतून ज्या दुसऱ्या ठिकाणीं ती जाण्याची असेल तेंथपर्यंत ती पोहोंचवितात; आणि अशा प्रकारें गांवोगांवच्या साहाय्यानें पडेल तें काम उठण्याची जी तजवीज होते, तिलाच हजरपेंड म्हणतात.

परंतु, अशा तऱ्हेचीं दुसऱ्याच्या मदतीनें होण्याचीं कामें थोडींच असतात. बहुतेक काम माहाराला स्वतःच उठवावें लागत असून, अशीं कामें पुष्कळ असतात ह्मटलें तरी चालेल. हरएक कामकाजासंबंधीं कोणास बोलवावयाचें असल्यास, गांवमाहार हजर असला पाहिजे. कारण, त्याला गांवची माहिती चांगली असल्यामुळें, प्रत्येक कामांत त्याची जरूर लागते; व तो नसला तर मोठी अडचण पडून कामाचा बोभाट होतो. लागवड, ओशिक, व पिकाचा निमताना, जंगलतपासणी, पैमाष पाहणी, बगर हुकमी कबजा, घराचा झाडा, अहवालाचा तपास, गुन्ह्याचा तलास, इत्यादि सर्व कामांत त्यालाच अवश्य हजर राहवें लागतें.

पैमाषीसंबंधीं साखळी ओढण्याचें काम तोच करतो, व तत्संबंधीं खुणांवर चुना घालण्याचा बोजाही त्याच्याच शिरावर असतो. गावांत एकादें गुरूं मेलें तर तें त्याला न्यावें लागतें; आणि हरएक प्रकारची दवंडी तोच पिटतो. याशिवाय, गांवांत कोणी सरकारी नोकर अथवा

संभावित गृहस्थ आला तर, स्वयंपाकासाठीं फांटी, व घोडे, बैल, इत्यादिकासाठीं गवत, वगैरे त्यालाच पुरवावें लागतें.

**गुजराथ** प्रांतांत **माहार** नसून, तिकडे अशा प्रकारची कामगिरी **धेड** उठवितात, व हे सर्व माहाराप्रमाणेंच उपयोगीं पडतात.

त्या प्रांतांत बिगारीचें काम घेण्याकरितां, **वेठ्यांची** नेमणूक निराळीच आहे, आणि ते जें पडेल तें काम करतात. यामुळें त्या प्रांतांत **ग्रामसंस्थांचें** काम सुरळीतपणें चालण्यास चांगलीच मदत होते.

ग्रामघोषिन्.

१५ **ग्रामघोषिन्** ह्मणजे गांवची दवंडी पिटणारा होय. क्वचित् ठिकाणीं ह्या गांवकामगाराची नेमणूक निराळी असेल; तथापि, **महाराष्ट्रांत** हल्लीं हें काम गांवमाहारच करतो.

ग्रामचर्मकार.

१६ **ग्रामचर्मकार** हा गांवचा चांभार असून, तो गांवांतल्या लोकांस पायतणें व जोडे पुरवितो.

पोतदार आणि इतर कामगार.

१७ **पोतदार** हा गांवचा सोनार होय. ह्याच्याकडे मुख्य काम ह्मटलें म्हणजे नाण्याची पारख करण्याचें असून, ह्याशिवाय तो गांवांतील सोन्यारूप्याचे दागिनेही घडवितो.

१८ शिंप्याकडे शिवण्याचें, किंवा दरज्याचे काम असते.

१९ तांबोळ्याकडे विड्याचीं पानें पुरविण्याचे काम असतें.

२० गवंड्याकडे भिंती वगैरे घालण्याचें गवंडी काम असतें.

२१ तेल्याकडे घाण्याचें, अथवा तेल गाळण्याचें काम असतें

२२ कासाराकडे भांडीं घडविण्याचें किंवा कासार काम असतें.

२३ बुरुडाकडे टोपल्या, सुपें, वगैरे विणण्याचें, व इतर बुरुड काम असतें.

२४ वाजंत्र्याकडे गांवांतील लग्नकार्यांत वाद्यें वाजविण्याचें काम, व जरूर लागेल तेव्हां गोंधळ घालण्याचें काम असतें.

२५ मशालजीकडे मशाल धरण्याचें काम असतें; व कोठें कोठें हा कचेरींतील दिवाबत्ती ही करतो.

२६ शिंगाड्याकडे शिंग वाजविण्याचें काम असतें.

२७ मंढव्याकडे भांडीं घांसण्याचें व जागा साफ करण्याचें काम असतें.

२८ वेठ्याकडे बिगार नेण्याचें काम असतें.

२९ मुलनाकडे[1] मुसलमान लोकांच्या धर्माचें, व मशीदीचें काम असतें. गांवच्या मुसलमान मुलांस हाच शिकवितो.

३० बागवानाकडे गांवच्या भाजीपाल्याचें व फळफळावळीचें काम असतें.

३१ ठाणग्याकडे डाक किंवा निरोप पोहोंचविण्याचें काम; किंवा चपराशानें करण्याची हरएक प्रकारची इतर कामगिरी असते; आणि

३२ मांगाकडे वधाचें काम असतें. क्वचित् प्रसंगीं मांग हा चामड्याच्या वाद्या, दोर, शिंकीं, वगैरे करतो. आणि केव्हां केव्हां त्याला पाहरा करण्याचेंही काम करावें लागतें.

गांवनोकरांचें वेतन, व इतर मुशाहिरा.

ह्या सर्व गांवनोकरास, त्यांच्याकडे जें काम असेल त्याच्या स्वरूपाप्रमाणें, थोडीबहुत वतन जमीन दिलेली असते. सदर्हू सर्व नोकरांत विशेष उपयोगाचे असे पाटील, कुळकर्णी, आणि माहार हे होत. माहाराला भरपूर काम असून, कांहीं कांहीं ठिकाणीं तर त्याच्या पोटापुरतें देखील त्याला वतन नसतें. त्या कारणानें, त्याचे फारच हाल होतात. परंतु केवळ, आपण गांवचे वतनदार

१ ही नेमणूक मुसलमानी अमलानंतर ग्रामसंस्थेंत सामील झाली आहे.

मिराशी आहोंत, इतकेंच समाधान मानून तो कसे तरी दिवस कंठतो, आणि आपल्या पोटाचा गुजारा करतो. वतनी जमीन किंवा रोकड पंचोत्रा, याशिवाय महाराला प्रत्येक खातेदाराकडून लाणीच्या हंगामांत दर खळ्यास जमिनीच्या प्रमाणान्वयें भाताचा भारा, किंवा धान्य मिळतें; आणि गांवांत प्रत्येक घरामागें चतकोर, अर्धी, पाऊण, अथवा एक भाकरी, याप्रमाणें बहुतकरून रोज देण्यांत येते.

गांवनोकरांचे प्रकार.

गांवनोकरांत, **रयत** उपयोगी आणि **सरकार** उपयोगी असा प्रकार असून, सदरहू दोन्हीं कामें सार्वजनिक उपयोगाचींच असें समजून, तत्संबंधीं सर्व नोकरांस वतन जमीन ह्मणून दिलेली असते. ही जमीन कामाच्या मगदुराप्रमाणें कमीजास्ती असून, त्या नोकरांपैकीं जे विशेष उपयुक्त आहेत त्यांस वतनी जमिनीखेरीज रोकड मुशाहिरा, अथवा नक्त नेमणूक, ही असते.

सरकारी अथवा सार्वजनिक कामाशिवाय, हे नोकर व्यक्तिमात्राचें देखील खाजगी काम प्रसंगानुसार हम्मेश करितात. अशा वेळीं, त्यांना त्या त्या व्यक्तीकडून, कामाच्या स्वरूपानुरूप योग्य मोबदला मिळतो; व तितक्यानेंच ते अगदीं संतुष्ट असतात. आणि त्यांस, नोकरीच्या मुशाहिऱ्याच्या संबंधानें हम्मेश खूष राखणेंही फार अवश्यकतेचें असतें. कारण, तसें केलें नाहीं तर, ते व्य-

क्तिमात्राचें खानगी काम करण्याचेंच वर्जितात; व तेणें-करून प्रजावर्गापैकीं, प्रत्येकाची विशेष गैरसोय होते. परंतु आपापल्या कामाचा निराळा मुशाहिरा दिल्यानें ही अडचण दूर होत असल्यामुळें, कोणीही तो देण्यास नाकारीत नाहीं.

हा व्यक्तिमात्राचा मुशाहिरा नक्त नसून, तो गल्ल्यानें ह्मणजे ऐनजिनशी देण्यांत येतो. म्हणजे पिकाच्या हंगामांत भाताचे भारे, किंवा भात, अथवा ज्वारी, बाजरी, नाचणी, व वरि, इत्यादि धान्य, ज्यानें जसें काम केलें असेल त्या मानानें देण्यांत येतें; आणि अशा प्रकारें गल्ल्याच्या रूपानें दिलेल्या मुशाहिऱ्यास बलोतें असें म्हणतात.

भारतीय ग्रामरचना ही चिमुकलीशी राज्यसंस्थाच होय.

सदरहू प्रकारच्या ग्रामरचनेवरून इतकें पूर्णपणें लक्षांत येईल कीं, हिचें स्वरूप एखाद्या लहानश्या राज्यसंस्थेप्रमाणेंच[1] आहे.

---

1 "*The village communities are little republics*, having nearly every thing they can want within themselves, and almost independent of any foreign relations. They seem to last where nothing else lasts. Dynasty after dynasty tumbles down; revolution succeeds to revolution; Hindu, Pathàn, Mogal, Maharatta, Sikh, English, are all masters in turn; but the village community remains the same.

( पुढें चालू )

ही **ग्रामसंस्था** प्रजासत्ताक असून, तिनें आपल्या सुखा-च्या, व आपल्या जरूरीपुरत्या, यच्चावत् सोयी लावून ठेविल्या आहेत. आणि त्याही अशा रीतीनें कीं, परा-वलंबनाची यत्किंचित् देखील जरूर न लागतां, गांवांतल्या गांवांत समाजसुखाचे सर्व कारभार करता यावेत. ह्या व्यवस्थनें **भारतीयांस स्वावलंबनाचा** दृढाभ्यास होऊन, ही **ग्रामसंस्था** चिरायु, किंबहुना अजरामरही झाली आहे. असंख्य राज्यांची उलथापालथ झाली. हजारो राजे होऊन गेले. अगणित संस्थानें धुळीस मिळालीं. व मोठमोठीं साम्राज्यें लयास गेलीं. तथापि, आमची ग्राम-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

In times of trouble they arm and fortify themselves; an hostile army passes through the country ; the village communities collect their cattle within their walls, and let the enemy pass unprovoked. If plunder and devastation be directed against themselves, and the force employed be irresistible, they flee to friendly villages at a distance ; but when the storm has passed over, they return and resume their occupations. If a country remain for a series of years the scene of continued pillage and massacre, so that the villages cannot be inhabited, the scattered villages neverthless return whenever the power of peaceable possession revives. A generation may pass away, but the succeeding generation will return.

( पुढें चालू )

रचना, अद्यापि देखील, आपलें डोकें वर करूनच राहिली आहे. परचक्र आल्यावर तिच्यांत योग्य सामर्थ्य असल्यास, ती त्याच्याशीं सामना करते. परंतु, त्याचें बलाबल पाहून त्याच्याशीं आपला टिकाव लागणार नाहीं असें तिला वाटल्यास, ती लागलेंच आपलें अंग काढून घेते; व भावी उद्भवणाऱ्या संकटापासून होतां होई तोंपर्यंत ती

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

The sons will take the places of their fathers; the same site for the village, the same position for the houses, the same lands will be reoccupied by the descendants of those who were driven out when the village was depopulated; and it is not a trifling matter that will drive them out, for they will often maintain their post through times of disturbance and convulsion, and acquire strength sufficient to resist pillage and oppression with success. This union of the village communities, each one forming a separate little state in itself, has I conceive, contributed more than any other cause to the preservation of the people of India, through all the revolutions and changes which they have suffered, and is in a high degree conducive to their happiness, and to the enjoyment of a great portion of freedom and independence."

(Sir C. T. Metcalfe. Report of the select Committee of the House of Commons, 1832. vol. III. Appendix. 84. P. 331).

अगदींच अलिप्त राहते. विशेष संकट येऊन ठेपलें, अथवा अत्यंत अरिष्ट ओढवलें, किंवा प्राणावरच येऊन बितली, तर गांवचे लोक अन्यत्र जातात; आणि आपल्या मालमत्तेचा व जीविताचा, येनकेन प्रकारेण, बचाव करितात. त्यायोगानें कधीं कधीं गांवच्या गांव देखील ओसाड पडतात. परंतु ती वैराणस्थिति कायम राहत नाहीं. कारण, आलेलें भयंकर वादळ लयास जाऊन, संग्रामाच्या झंझावाताचें कोठेंही यत्किंचित् देखील चिन्ह राहिलें नाहीं, आणि अखिल आकाश अगदीं निरभ्र झालें आहे, अशी खात्री झाल्यावर, गांवचे सर्व लोक लागलींच स्वस्थानाप्रत प्राप्त होतात. आणि जो तो आपापल्या कामधंद्यास लागून, आपली वतनी जमिन, शेतेंभातें, घरेंदारें, इत्यादिकांचा यथेच्छ उपभोग घेतो. आणि ह्या कारणानेंच, आज हजारों वर्षांच्या प्रचंड राज्यक्रांतींतही, आमची ग्रामरचना अद्यापि कायम राहिली आहे, व आमचें स्वातंत्र्य अगदींच नष्ट असें कधींही झालें नाहीं.

तिची व्याप्ति, तिचें प्रातिनिधिकत्व, व स्वावलंबन.

प्रथमतःच निरूपण केल्याप्रमाणें, आमची सामाजिक रचना फारच प्राचीन[1] असून, तिचें बीज इतस्ततः सर्व भरतभूमीवर पसरलेलें आहे. हिचें मूलस्व-

1 *** "The East is certainly full of fragments of ancient society. Of these, the most instructive,

( पुढें चालू )

रूप अजूनही पूर्वस्थितींत दिसत असून, तिची रचना इतकी

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

because the most open to sustained observation, are to be found in India."

(Maines' Village Communities. P. 13).

"But the answer is that the social constitution of India is of the extreme ancient, that of England of the extreme modern type."

(Maines' village communities. P. 56).

1 "And over the greatest part of the country the village-community has not been absorbed in any larger collection of men or lost in a territorial area of wider extent. For fiscal and legal purposes it is the proprietary unit of large and populous provinces. It is under constant and careful observation, and the doubtful point which it exhibits are the subject of the most earnest discussion and of the most vehement controversy. No better example could therefore be given of the new material which the East, and especially India, furnishes to the juridical enquirer."

(Maines' Village Communities.
P. P. 12-13).

"No Indian phenomenon has been more carefully examined, and by men more thoroughly in earnest, than the Village-Community. For many years past the discovery and recognition of its existence have ranked among the greatest achievements of Anglo-Indian administration."

(Maines' Village Communities. P. 103.)

कांहीं विलक्षण आणि आश्चर्य करण्यासारखी आहे कीं, तत्संबंधीं जितका जितका ह्मणून जास्त विचार करावा, तितका तितका, तिची अंतर्गत स्थिति जाणण्याविषयींची जिज्ञासा होण्यास, तो कारणीभूत होतो. आणि ह्या कारणानेंच तत्संबंधीं जास्त विचार व उहापोह उत्तरोत्तर होत चालला आहे. प्रत्येक बाबतींत या ग्रामसंस्थेचें महत्व विशेष दिसून येतें. ती स्वतंत्र असून स्वावलंबी

---

1 "For, this remarkable society, pregnant with interest at every point, and for the moment easily open to our observation, is undoubtedly passing away."

(Maines' Village Communities P. 24.)

2 "The true view of India is that, as a whole, it is divided into a vast number of independent, self-acting, organised social groupstrading, manufacturing, cultivating. The English agricultural labourers of whom we spoke, are a too large, too indeterminate class, of which the units are too loosely connected, and have too few interests in common, to have any great power of retaining tradition. But the smaller organic groups of Indian society are very differently situated. They are constantly dwelling on traditions of a certain sort, they are so constituted that one man's interests and impressions correct those of another, and some of them have in their council of elders a permanent machinery for declaring traditional usage, and solving doubtful points."

(Maines' Village Communities. P. 57/58.)

आहे; आणि सामाजिक असून व्यवस्थित आहे. व ह्मगू-नच गांवची शेतीभाती, व्यापारधंदा, कलाकौशल्य, आणि साहस व उद्योग, इत्यादि सर्व गोष्टींचें चालकत्व तिच्या-कडेसच असतें; सर्व प्रकारची व्यवस्था तीच पाहते; व

---

1 "I have several times spoken of them as organised and self acting. They, in fact, include a nearly complete establishment of occupations and trades for enabling them to continue their collective life without assistance from any person or body external to them. Besides the Headman or Council, exercising quasi-judicial, quasi-legislative power, they contain a village police, now recognised and paid in certain provinces by the British Government. They include several families of hereditary traders; the Black-smith, the Harness maker, the Shoe-maker. The Brahmin is also found for the performance of ceremonies, and even the Dancing-Girl for attendance at festivities. There is invariably a Village Accountant, an important personage among an unlettered population so important, indeed, and so conspicuous that according to reports current in India, the earliest English functionaries engaged in settlements of land were occasionally led by their assumption that there must be a single proprietor somewhere, to mistake the Accountant for the owner of the village and to record him as such in the official register."

(Maines' Village Communities. P. 125).

तींत **प्रातिनिधिक** तत्वाचें बीजारोपण केलेलें निर्विवाद दृष्टीस पडतें.

बलोतेंदार व अलोतेंदार.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें, **ग्रामभृतांचे रयत** उपयोगी आणि **सरकार** उपयोगी असे दोन प्रकार असून, त्यांत एकंदर १२ **बलोतेंदार** व (१२) **अलोतेंदार** आहेत. बारा **बलोतेंदार** ह्मटलें ह्मणजे १ सुतार, २ लोहार, ३ कुंभार, ४ न्हावी, ५ धोबी अथवा परीट, ६ गुरव, ७ जोशी, ८ भाट, ९ मुल्ना, १० चांभार, ११ महार अथवा धेड, आणि १२ मांग असे असून, बारा (१२) **अलोतेंदारांत**, १ सोनार, २ शिंपी, ३ तेली, ४ तांबोळी, ५ बागवान, ६ गोंधळी, ७ शिगाड्या, ८ जंगम ( लिंगाईत गुरव ), ९ गोसावी, १० कोळी किंवा वेठ्या, ११ रामोशी, व १२ तुरळ अथवा येसकर, यांचा समावेश होतो.

**खानदेश**, आणि **गुजराथ**, इकडे **रामोशाचें** काम **भील** लोक करतात; व हे **भील** गांवनोकर असल्यास

---

1 "It is not, however, disputed that villages are found in great numbers in which the Government is lodged with a Council, neither claiming to be nor regarded as being any thing more than a *representative of the entire cultivating body.*"

(Maines' Village Communities. P. 155).

त्यांस **गुजराथेंत वर्तनिया** असें म्हणतात. तुरळ किंवा येसकर यांचें काम बहुतेक गांवमाहारासारिखेंच असतें.

सदरहू बलोतेंदार आणि अलोतेंदार यांच्या नेमणूकींत, भिन्न भिन्न संप्रदाय, देशाचार, व रूढीअन्वयें, पुष्कळ कमी जास्ती होऊन त्यांत हल्लीं बराच फेरफार झाला आहे. आणि ह्या सर्व गांवनोकरांबद्दल तपशीलवार वर्णन पूर्वीं दिलेंच आहे. त्यावरून प्रत्येकाची इतिकर्तव्यता ध्यानांत येईल. इतकेंच नाहीं तर, त्यांच्या श्रमविभागावरून आमच्या **ग्रामसंस्थांचें**[१] एकंदर स्वरूप,

I "The village-communities which are still found in the Eastern world, exhibit, at first sight, a much simpler structure than appears on close examination. At the out-set they seem to be associations of kinsmen, united by the assumption (doubtless, very vaguely conceived) of a common lineage. Sometimes the community is unconnected with any exterior body, save by the shadowy bond of caste. Sometimes it acknowledges itself to belong to a larger group or clan. But in all cases the community is so organised as to be complete in itself. The end for which it exists is the tillage of the soil, and it contains within itself the means of following its occupation without helf from outside. The brother-hood, besides the cultivating families who form the major part of the group, comprises families hereditarily engaged in the humble arts which furnish

( पुढें चालू )

त्यांचें प्रशंसनीय स्वावलंबन, सामाजिक सुखाविषयीं त्यांची पूर्णदक्षता, अन्तर्गत व्यवस्थेसंबंधीं परस्परानुबंधन, आणि परावलंबनाविषयीं तिटकारा, इत्यादि गोष्टी चांगल्या प्रकारें व्यक्त होतील.

उपजीविकेचें मुख्य साधन कृषिकर्मावरच अवलंबून असल्या कारणानें, गांवचा बहुसमाज कृषीवलच असतो. तथापि, ह्याशिवाय इतर धंद्याचेही लोक गांवांत राहून आपला उदरनिर्वाह करतात; व जो तो आपला उद्योग स्वतंत्रपणें चालवितो. यामुळें एकाची दुसऱ्यास मदत होऊन गांवचें काम सुरळीतपणें निभतें, आणि तंटाबखेडा होत नाहीं. क्वचित् प्रसंगीं तो उद्भवलाच तर, गांवची छोटेखानी **न्याय**सभा अथवा **पं**चायत त्याचा इन्साफ करते, आणि तो सर्वांस मान्य होतो. याप्रमाणें अन्तःस्थितीची व्यवस्था असून, बाह्यस्थिति किंवा **ग्रामसंरक्षण**, या संबंधानें देखील असाच बंदोबस्त राहतो. लोकसंख्येच्या मानानें गांवांत थोडी बहुत शिबंदी

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

the little society with articles of use and comfort. It includes a village watch and a village police, and there are organised authorities for the settlement of disputes and the maintainance of civil order."

(Maines' Village Communities.
P. P. 175-176).

(Pán. I. 1, 48 rd. Ballantyne. P. 559.)

असते; व शिवाय जरूरीप्रमाणें गांवनोकरांचाही भरणा असतो; आणि त्या सर्वांवर **ग्रामाधिकारी** किंवा **देशाधिकारी** हा योग्य ती देखरेख ठेवितो. ह्या ग्रामपतींचा गांवच्या नोकरांवर, गांवच्या शिल्पकारांवर[1], आणि गांवच्या प्रजेवर, बराच दाब असतो; त्यामुळें गांवांत सर्वत्र व्यवस्था राहते, आणि एकंदर **ग्रामसंस्थेचें** काम चांगलें चालतें.

भारतीय संस्थांचें आनुवंशिकत्व.

आमच्या **भारतीय** ग्रामसंस्थांत बहुतकरून, आनुवंशिक प्रभुत्व, आनुवंशिकसत्ता, आनुवंशिक पराक्रम, आनुवंशिक तेज, आणि आनुवंशिक बुद्धिचातुर्य इत्यादि

---

१ नागेशाच्या मतें गांवचे मुख्य शिल्पकार म्हटलें म्हणजे १ कुलाल ( कुंभार ), २ कर्मार ( लोहार, सोनार, इत्यादि ), ३ वर्धकी ( सुतार ), ४ नापित ( नाहावी ), आणि ५ रजक ( धोबी ), असे होत. हे पांच ज्या गांवांत आहेत त्या गांवाला पंचकारुकी असें म्हणतात.

2 "I shall have hereafter to tell you that in certain of the Indian communities there are signs of one family enjoying an hereditary pre-eminence over the others, so that its head approaches in some degree to the position of chief of a clan, and I shall have to explain that this inherited authority is some times partially and sometimes exclusively judicial, so that the chief becomes a sort of hereditary judge.".

(Maines' Village Communities
P. P. 68/69).

दृष्टिगोचर होतें. जीं जीं कुटुंबें वंशपरंपरेनें मोठेपणा भोगीत आलीं आहेत, त्यांच्या कडेसच तो बहुतकरून पिढीजात चालतो. तेजःपुंज कुळांत राजकार्य धुरंधर, तेजस्वी, सत्ताधारी, आणि पराक्रमी पुरुषच निपजतात. आणि इतर भिन्नभिन्न कुळांत ज्याच्या त्याच्या धंदेवारीप्रमाणें बुद्धि, कला, चातुर्य, इत्यादि गुणांनीं संपन्न असे पुरुष उत्पन्न होतात. व ह्या कारणानेंच, ग्रामसंस्थेच्या नेमणुकाही वंशपरंपरेनेंच चालविल्या असल्याचें दिसतें.

हे आनुवंशिक गुणकलाप, भिन्नभिन्न वर्णाप्रमाणें, निरनिराळ्या प्रकारचे दिसून येतात; व ज्या त्या कुळांतले गुणधर्म, त्या त्या कुळांतल्या पुरुषांत किंवा व्यक्तिमात्रांतच प्रज्वालितपणें दृष्टिगोचर होतात.

आमच्या **हिंदू** लोकांत, **वर्ण**व्यवस्थेचें बीज फार प्राचीन काळापासूनच पेरलेलें असल्याचें दिसतें. कारण ह्या वर्णव्यवस्थेचा उल्लेख, अखिल जगत्तलावरील **आदिग्रंथ** जो **ऋग्वेद** त्यांतही केला असल्याचें मागें सविस्तर सांगितलेंच आहे. आतां, धंदेवारीच्या संबंधानें **आर्य**-समाजाचे चार विभाग करण्यांत येऊन, त्यांस **वर्ण** अशी

---

१ भाग १६ वा. पान ३९ ते ४३ पहा.

"ब्राह्मणोस्य मुखमासीद् बाहूराजन्यः कृतः ।
ऊरू तदस्य यद् वैश्यः पद्भ्यां शूद्रोऽजायत ॥"

(ऋ. अ. ८ मं. १० अ. ७.)

संज्ञा दिली. तथापि, त्याचा मुळ हेतु इतकाच होता कीं, त्या योगानें समाजबंधन, व धर्मबंधन राहून, ज्याला त्याला आपल्या इच्छेनुरूप अगदीं स्वतंत्र धंदा करतां

---

1 "The common religious sanction, binding the various groups of native Indian society together, finds an out-ward and practical expression in the usages of caste. * * * There is only one perfect universal caste, that of the Brahmins ; there are a certain number of isolated dynasties and communities pretending to belong to the second of the theoretical castes; but, in the enormous majority of instances, caste is only the name for a number of practices which are followed by each one of a multitude of groups of men, whether such a group be ancient and natural, or modern and artificial. As a rule, every trade, every profession, every guild, every tribe, every clan is also a caste, and the members of a caste not only have their own special objects of worship, selected from the Hindoo pantheon or adopted into it, but they exclusively eat together and exclusively intermarry. You will see at once that a solidity is thus given to all groups of men which has no counterpart in the Western world, and you can understand, I think, without difficulty, how it is that all the old natural elements of society have been preserved under the influence of caste in extraordinary completeness, along with the institutions and ideas which are their appendage."

(Maines' Village Commuuities.
P. P. 218/220)

यावा, त्यांत तो पारंगत व्हावा, आणि तेणेंकरून विद्याभिवृद्धि व कलाभिवृद्धि होऊन, देशांत चिरकाळ आबादानी राहावी, आणि निरंतर समृद्धि असावी.

परकीयांचा अम्मल, व ग्रामसंस्थांचा ऱ्हास.

परंतु "प्रतिहतंममंगलम्"[1], ही आमची वर्णसंस्था व ग्रामसंस्था लवकरच लयास जाईल कीं काय, अशी आतां दिवसानुदिवस फारच भीति[2] वाटूं लागली आहे. कारण, परद्वीपस्थ प्रभूंचे आचार, विचार, आणि पद्धति, यांचा अप्रशस्त शिरकाव[3] आमच्या चालींत, व रीतिभातींत अगदीं बेधडक होत चालला आहे. आमचें जें जें ह्मणून

---

१ 'इडापिडा टळो,' असेंही आपण मराठींत म्हणतो. इंग्रजींत God forbid', असें म्हणतात.

2 "For, this remarkable society, pregnant with interest at every point, and for the moment easily open to our observation, is undoubtedly passing away. Just as according to the Brahminical theory each of the Indian sacred rivers loses in time its sanctity, so India itself is gradually losing every thing which is characteristic of it."

(Maines' Village Communities. P. 24).

3 "Here, there has been a complete revolution of thought, in literature, in taste, in morals, and in law. I can only compare it to the passion for the literature of Greece and Rome which overtook the Western World at the revival of letters;"

(Maine.)

उत्तम किंवा अनुकरणीय आहे, तें तें सर्व नष्ट होत जाऊन, त्या ऐवजीं जें जें ह्मणून अगदीं कनिष्ट, निरस, व फोल, तेंच आमच्या पदरांत पडत चाललें आहे. आमचे सद्गुण जाऊन, आह्मांस दुर्गुण प्राप्त होत चालले आहेत. आमची नीति बिघडून, आह्मांत अनीतीचा प्रसार होऊं लागला आहे. आणि धैर्य व स्वावलंबन ह्यांस आम्ही बहुतेक आंचवले जाऊन, उद्वेग व परावलंबन ह्यांच्याशींच आमचें दृढबंधन झालें आहे. आणि ही गोष्ट परद्वीपस्थ प्रभूंना देखील कबूल करणें भाग आहे.

आमची रूढि, व आमचे संप्रदाय, हे इतके बलवत्तर

1 "And yet the comparison does not hold, since I must honestly admit that much which had a grandeur of its own is being replaced by a great deal which is poor and ignoble."

(Maine.)

२ इंग्रजी अमलांत, ह्या भरतभूमींत, दारूचा प्रसार इतका कांहीं झपाट्यानें होत चालला आहे कीं, ततूसंबंधीं निरर्गल स्थिति, व अनीतीचें वर्तन पाहून, केवळ आम्हां भारतीयांसच लाज वाटूं लागली आहे असें नाहीं. तर त्याचा परिणाम सदरहू विचार करणाऱ्या इंग्रजांवरही होऊन, त्यांनीं " मितपान परिषद् " नांवाची मंडळी (Temperance Association) ठिकठिकाणीं स्थापिली आहे. त्याच प्रमाणें, अफीणीच्या व्यसनाचाही फैलाव होऊन, तो दिवसानुदिवस जोरानें वाढत चालला आहे. आणि त्यापासून उद्भवलेल्या परिणामाचीं चिन्हें चांगलीं दिसूं लागल्यामुळें, इंग्लंडांतील पार्लमेंट सभेंतही त्याबद्दल चर्चा होऊन, त्यांनीं बहुमतें ततूसंबंधीं आपली दिलगिरी व असंमति प्रदर्शित केली, व हिंदुस्थान सरकारास ठपका दिला.

आहेत कीं, तसे अन्यत्र कोठेंही नसतील. तथापि, राजा कालस्य कारणम् या न्यायानें, परकीयांच्या अमलाखालीं आमच्या बहुतेक सुसंस्थांचा अगदीं चुराडा होऊन, आमच्या चांगल्या चाली व रीतिभाति, ह्यांचेंही दिवसानुदिवस मातेरेंच होत चाललें आहे. आणि ह्या सर्व गोष्टींला प्रत्यक्ष कारण म्हटलें ह्मणजे इंग्रजी अम्मलच होय, असें सरळ

1 "There is no country, probably, in which Custom is so stable as it is in India ; yet there, competing with the assumption that custom is sacred and perpetual, is the very general admission that whatever the sovereign commands is custom."

(Maines' Village Communities. P. 9).

2 "It would be absurd to deny that the disintegration of Eastern usage and thought is attributable to British dominion." * * *

"If I were to describe the feeling which is now strongest with some of the most energetic Indian administrators, I should be inclined to call it a fancy for reconstructing native Indian society upon a purely native model; a fancy which some would apparently indulge, even to the abnegation of all moral judgment. But the undertaking is not practicable. It is by its indirect and for the most part unintended influence that the British power metamorphoses and dissolves the ideas and social forms underneath it."

(Maines' Village Communities.
P. P. 26. 27. 28.)

विचार करणाऱ्या कोणत्याही मनुष्याच्या लक्षांत आल्या-वांचून खचित राहणार नाहीं.

अशा प्रकारची आमची हीनावस्था, केवळ आमचें स्वातंत्र्य नष्ट झाल्यामुळें, आह्मांस प्राप्त झाली आहे. खरो-खर, एक स्वातंत्र्य नाहिसें झालें म्हणजे अनेक संकटें ओढवतात, व नानाविध दुःखें सोसावीं लागतात. एका कवि[1] पुंगवानें म्हटलें आहे कीं,

**फारचि बरी निरयगति ।**
**परवशता शतगुणें करी जाच ॥**

ग्रामसंस्थेपासून भारतीयांचें हित.

आमची ही **ग्रामव्यवस्था** आम्हांस फारच हितावह आहे; आणि दैवदुर्विपाकानें जर कां हिचा अगदींच चुराडा झाला तर, आमच्या ह्या **भारतीय** समाजाचें केवळ अपरिहार्य नुकसान होईल. कारण, आमच्या ग्रामरच-नेंत परस्परावलंबन सज्जड असल्यामुळें, तिचें तें दृढबंधन वि-शेष श्रेयस्कर होतें. मुळच्या **ग्रामसंस्थें**त गांवची मालकी ह्मटली ह्मणजे कृषीवलांची होय. ह्या कृषीवलांत जे वयो-वृद्ध, व तपोवृद्ध, अथवा विद्यावृद्ध असतील, ते **पंच** या ना-त्यानें गांवच्या सर्व जमिनीवर एकंदर वांटणी करून तिची व्यवस्था लावितात; आणि तिचें निघेल तेवढें पीक घेण्या-विषयीं उद्युक्त असतात. ह्या पिकांतून **सरकार**चें अवश्य

---

१ मयूर. विराट पर्व.

तें देणें अगोदर देऊन, बाकी राहील त्यापैकीं कांहीं भाग ग्रामाधिकारी किंवा गांवपाटील, व कुळकर्णी, मिराशी, धेड, लोहार, सुतार, कुंभार, नाहावी, परीट, मढवी, आणि इतर बलोतेंदार व अलोतेंदार, इत्यादिकांस, ज्याच्या त्याच्या महत्वानुरूप व श्रमाप्रमाणें देऊन, बाकीचा अवशिष्टभाग जो तो आपापल्या कुटुंबसंरक्षणार्थ ठेवितो.

सार्वजनिक उपयुक्त काम, अनाथसंरक्षण, दुर्बलरक्षा, अतिथि अभ्यागताचें आदरातिथ्य, हद्दीबाबद विवाद, इत्यादि प्रत्येक जोखमीचें व महत्वाचें काम, गांवचे **पंच** गांवकऱ्यांच्या मदतीनेंच करतात. **पाटील** गुन्ह्याचा तपास लावून इन्साफ करतो; दंगेधोपे न होण्याविषयीं खबरदारी ठेवितो; आणि लागवड ओशिकाची पहाणी, बगरहुकुमी कबजा, गुरचरण, वनचराई, बांधदगड, पाट, बंधारें, इत्यादींची योग्य ती चौकशी करून तजवीज लावतो. **कुळकर्णी** गांवासंबंधीं सर्व लिहिण्याचें काम करतो. गांवच्या सफाईचें आणि वाटाड्याचें काम गांव**मिराशी** व **धेड** करतो. गांवची धर्मशाळा व देवळें **गुरव** किंवा **मढवी,** झाडून सारवून, स्वच्छ ठेवितो. आणि गांवासंबंधीं बाकीचें सर्व काम, **सुतार, लोहार, कुंभार, नाहावी,** इत्यादि गांवचे कारागीर, व इतर **बलोतेंदार** आणि **अलोतेंदार,** पूर्वी तपशीलवार वर्णन केल्याप्रमाणें, जसें ज्यावेळीं पडेल तसें त्यावेळीं बिनहरकत करतात.

तेव्हां, स्वनियंत्रित आणि स्वचेष्टित, अशी ही अति महत्वाची **ग्रामसंस्था** अजिबात नाहींशी झाली तर, आमच्या समाजाचें केवढें बरें नुकसान होईल? खरोखर आमचें सामाजिक बंधन अगदींच शिथिल होईल, किंबहुना तुटेल; आणि हा जीवनकलह केवळ विकोपास मात्र जाईल, यांत संशय नाहीं.

**सर जेम्स केर्ड**[1] हे आमच्या **ग्रामसंस्थेला**, "**भारतीय राज्यशकटाचें** एक मुख्य व महत्वाचें अंग" समजतात. इतकी ही समाजरचना विशेष महत्वाची आहे.

---

1 "And the late Sir James Caird, in his famine-report, calls the village-organization 'the sheet anchor of Indian Statecraft;' and regards the 'disruption of the mutually helpful bond of village society' as the most fatal misadventure that can befall the people in their struggle for life. * * * The constitution of these village communities, self-contained and self-governing little republics, is pretty generally known."

(Sir. William Wedderburn
Bart. A. Q. R.)

# शुद्धिपत्रक.

———:०:———

| पृष्ट. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | ११ | आहे | आहे. |
| २ | १२ | सद्री | सद्रीं |
| ३ | १२ | फेरबद्धल | फेरबद्ल |
| ,, | १६ | हळू हळू | हळूं हळूं |
| ८ | १४ | प्रजेनं | प्रजेनें |
| १४ | ११ | विपदावस्थेंत | विपद्वस्थेंत |
| १९ | २१ | तस्माद्द्युद्धं | तस्माद्युद्धं |
| २३ | ९ | कूैट | कुटै |
| २६ | १९ | श्रृतिः | श्रुतिः |
| ३६ | ११।१२ | होण्याण्यासाठीं | होण्यासाठीं |
| ३९ | १५ | वर्गिकरण | वर्गीकरण |
| ४९ | ८ | सत्यवादी | सत्यवादी' |
| ५७ | ६ | द्रवड | द्रवडा |
| ८३ | ७ | सत्यवादा | सत्यवादी |
| ११३ | ७ | पडतें. | पडते. |
| ,, | १२ | पंचाची | पंचांची |
| ११८ | ५ | पंचावर | पंचांवर |
| ,, | ९ | अमन्य | अमान्य |
| ११९ | १८ | व्यंसनं | व्यसनं |
| १२१ | ९ | इतिकर्तव्यत | इतिकर्तव्यता |
| १२३ | १७ | जीर्णोधार | जीर्णोद्धार |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| १२४ | १२ | बरसांत | बरसात |
| १२५ | १६ | केलेली. असून, | केलेली असून, |
| १२६ | ४ | जात्या | ज्या त्या |
| १२८ | १७।२० | Hereditory | Heriditary |
| ,, | १८ | as are | as an |
| ,, | १९ | removable | removeable |
| १३१ | ११ | farmer | former |
| १३२ | ८ | तऱ्हेची | तऱ्हेचीं |
| ,, | ११ | रहएक | हरएक |
| १३४ | १८ | काल | कोलें, |
| १३९ | १ | असते | असतें. |
| १५० | २३ | Helf | Help |

---